# अंक पहिला

[ अण्णासाहेबांच्या मलबारहिलवरील बंगल्यांतील दिवाणखाना—आधुनिक फर्नीचरनें सुशोभित केलेला. उजव्या बाजूच्या खिडक्यांतून सूर्याचीं कोंवळीं किरणें आंत आलीं आहेत. अण्णासाहेबांची मुलगी रमा खिडकींत उभी राहून गात आहे. साधा पण नीटनेटका पोषाख केलेली, चेहऱ्यावर बालिशपणाची मुद्रा, सदा हंसतमुख पण थोडीशी कुर्रेबाज, चालचलणुकींत गडबड आणि धांदल फार. वय सुमारें विशीच्या आसपास—खालील पद म्हणत आहे. ]

**रमा**:—

**जणुं अनंत अंबरिं घन भरले ।**
**क्षणिं आले । क्षणिं गेले । मोत्यांचे झोले ॥ धृ० ॥**
**धांव गड्या रे धांव । धांव गड्या रे पाव**
**पाउसा घनसंभार-जलें । नाभिं जे धडधड ।**
**करिते गडबड । बिजली बाई विझली नाहीं ।**
**तोंवरि येई भिजवुनि जाई घनमाले ॥ १ ॥**

[ रमा वरील पद म्हणत असतां तारा प्रवेश करते. तारा ही रमेची बालमैत्रीण. अगदीं पहिल्यापासून दोघीही बरोबर वाढल्या खेळलेल्या—वयानें सारख्याच असल्या तरी दिसण्यांत तारा रमेपेक्षां कमी वयाची दिसते. पोषाखांत थोडी नखरेलपणाची छटा—वृत्तीनें जरा गंभीर—हंसण्यांत सुद्धां कंजूषपणा दाखवणारी—रमेच्या मनमोकळया हंसण्यापुढें तारेचा गंभीरपणा छाया-प्रकाशाप्रमाणें उठून दिसतो. ]

**तारा**:—हिंवाळयाचे दिवस हे अन् तूं पावसाला आळवतेयस—काय म्हणावं तुझ्या या असमाधानी वृत्तीला ?

**रमा**:—[ गात असतांना मधेंच थांबून ] माणूस प्राण्याचा स्वभावच असतो हा ! नसेल ते हवंसं वाटतं. पाऊस कोसळूं लागला कीं उन्हाची आठवण होते—नि उन्हाच्या कडाक्यांत हिंवाळयासाठीं जीव आसुसतो !

**तारा**:—अग या हिंवाळयानंतरच उन्हाळा यायचा—नव्हे, वसंताचा बहर फुलायचा—अन् तूं म्हणतेस पाऊस हवा ! वसंत नसला तरी निदान हेमंताला तरी हांक मारायची होतीस !

**रमा**:—आतां पहा हं ! मी चिडेन ! तें नाव कशाला काढलंस ?

**तारा**:—कां ? तेंच नांव घ्यायचंय ना आतां तुला जन्मभर ?

**रमा**:—आतांच्या भाषेंत ! जुनी पद्धत म्हणायची, म्हणजे तें नांव जन्मभर वर्ज्य करायचं. केव्हां तरी, कुणाच्या तरी लग्नकार्यांत, दोन पदरांच्या गांठीं सोडतांना उखाण्याच्या कोंदणांत बसवून, केव्हातरी हिऱ्याच्या चमकीसारखं चट्कन् बोलून जायचं तें नांव. त्या जुन्या गमती म्हणजे आम्हा पोरींच्या लेखीं इतिहासांतल्या कथाच आहेत. नांव घेतल्याशिवाय आतां समाधानच होत नाहीं—नाहीं !

**तारा**:—तें मी कसं सांगूं ? मी नुसती पहातें आहें—ऐकतें आहें—ऐकून पाहून साठवतें आहें तुम्हा लोकांचे अनुभव. तशी वेळ येईल तेव्हां काय करायचं त्याची आंखणी करून ठेवतेंय एव्हांपासून.

**रमा**:—हेमंत नांव मोठं गोड नाहीं ग ?—हेमंत !

**तारा**:—सारींच नावं मला सारखीं वाटतात ! आतां ही नांव घ्यायची पद्धत सुरू झाली तेव्हांपासून नांवाच्या ध्वनिची अटकळ घेऊं लागलों आपण. मला वाटतं तीं आपलीं पूर्वीचीं मराठमोळयाचीं नांवं मोठीं चांगलीं होतीं. गोविंद, गोपाळ, नारायण—

**रमा**:—छिः ! अगदींच गद्य वाटतात हीं नांवं—अगदींच रुक्ष !

**तारा**:—देवांचीं नांवं आहेत तीं ! देवापेक्षां ऋतु आवडूं लागले आहेत आतां आपल्याला—वसंत, हेमंत, शरद ! बंगालचं आक्रमण आहे हें महाराष्ट्रावर. नांवंसुद्धां खाऊन टाकलीं या बंगाल्यांनीं आमचीं मराठयांचीं. उगीच मिरवतात अभिमान महाराष्ट्राचा—पण मराठयाच्या नांवाचा सुद्धां

मागमूस राहिलेला नाहीं. हेमंत ! ( मान हालवून ) मराठ्याचं नांव नाहीं वाटत. त्यापेक्षां 'हरी' असता तरी पत्करला असता.

**रमा**:—तुझ्या पत्कराला कोण विचारतंय ? मला पत्करलाय ना तो !

**तारा**:—खरंच तें ! पत्करायचं असतं, तें नांव. तें मी विसरलें होतें अगदीं. प्रत्यक्ष नांवाला नांवाची जोड दिली नाहीं तरी आडनांव खर्चीं घालावं लागतं ना आम्हा बायकांना ! पूर्वी नांवसुद्धां खर्चीं पडत होतं आपलं— आम्हीं आधुनिक म्हणवतों पण आम्हीं सुद्धां नांव खर्चीं घालायला तयार होतों—असं वाटतं, पुढं नांव बदलायचं तर आधींपासून कशाला हें नांव लावीत रहायचं ! कुणीशा एका कवीनं म्हटलंय—

**उगिच कां कुणामुळें । वेड लागलें तुला ॥**
**भंवतिंच्या गुणामुळें । विसर जीव-हेतुला ॥**
**परकि कोण भेटला । आपुलाच वाटला ॥ १ ॥**
**अपुलिया जगांतलीं । बहिण-भाउ-माउली ॥**
**शिशुपणांत जवळिलीं । हृदयिं हृदय जाहलीं ॥**
**परकि कवण कवळिला । तींहि दूर राहिलीं ॥ २ ॥**
**वडिलिं नांव ठेविलें । पळपळांत वाहिलें ॥**
**श्रुतिगुणें स्मृतींत जें । अढळ ठसुनि राहिलें ॥**
**आज त्वां कुणांमुळें । तेंहि नांव टाकिलें ॥ ३ ॥**

[ घंटा वाजते. गात असतांना मधेंच तारा थांबते. दोघीही दचकून दाराकडे पहात रहातात. दारांतून एक तरुण प्रवेश करतो. वयानें सुमारें तिशीच्या आंतला, प्रवासाचा पोषाख केलेला, चेहेरा सदोदित निर्विकार, मुद्रा प्रसन्न—आंत येतांना डोक्यावरची टोपी काढून हातीं घेतो आणि बाहेरून येणाऱ्या हमालाला सामान आंत आणून ठेवण्याची खूण करतो—हमाल दाराजवळ सामान ठेवतो. त्याच्या हातावर पैसे टाकून हमाल निघून जातांच तो दाराशींच उभा रहातो. दोघीही त्याच्याकडे आश्चर्यानें पहात असतात. पहातां पहातां रमेची मुद्रा एकदम बदलते आणि ती आश्चर्योद्गार काढून एकदम त्याच्या जवळ जाते. ]

**रमा**:—दादा !—हो दादाच—शंकाच नाहीं. दादा ! होय ना ? दादाच

ना तूं ? ( आंतल्या दाराजवळ धांवत जात ) अण्णा, दादा आलाय—आधीं लौकर या बाहेर. दादा आलाय !—( पुन्हां त्याच्याजवळ येऊन ) होय ना ? दादाच ना तूं ?—किती वर्षं झालीं रे दादा ! दहा नाहीं का ? दहा वर्षांपूर्वी गेलास तो आज येतोयस परत ? असा काय पहातोस ? ओळखलं नाहींस मला ? मी रमा—तुझी छोटी बहीण !—( त्याच्याकडे रोखून पाहून ) काय झालं ? बोलत कां नाहींस ? खरंच कां मला ओळखलं नाहींस ? इतकी का बदलून गेलेंय मी ? नाहीं रे दादा, तशी मोठी झालें असेन—पहा ना माझ्या तोंडाकडे—एक रेषा तरी बदललीय का ? अगदीं तेव्हां दिसत होतें तशीच नाहीं का मी दिसत ? फ्रॉक गेला न् साडी आली—एवढाच काय तो फरक ना ?—ये—बैस ना इथं. ( त्याचा हात धरून त्याला बळेंच खुर्चीवर बसवीत ) केवढा रे मोठा झालास तूं दादा ! हा माझा दादा बरं का तारा ! एवढीशी होतें मी तेव्हां अण्णांबरोबर भांडून कलकत्त्याला गेला. होय ना ?—( आंतल्या दाराकडे धांवत जात ) काय करतांय अण्णा, दादा आलाय ना—( पुन्हां त्याच्याजवळ येऊन ) बरं का तारा, किती रडले अण्णा तेव्हां ! किती काकुळतीला आले ! अशी मी या कोंपऱ्यांत बसलें होतें, असंच सामान घेऊन दादा निघाला होता. अण्णा म्हणाले, एवढासा बच्चा तूं—घरीं कांहीं कमी नाहीं—कशाला जातोयस कलकत्त्याला ? तेव्हां असाच मुखस्तंभासारखा उभा राहिला होता ! तडक निघून गेला बाहेर ! अन् मग अण्णांना रडूं कोसळलं—आठवतं ना तुला दादा ?

**दत्ताः**—( अगदीं रूक्षपणें ) आठवतं !—गेलों तें आठवतं ! मी गेलों तेव्हां अण्णा रडले म्हणतेस ?

**रमाः**—दादाच तर तूं ! बरं का तारा, पहिल्यापासून दादाचा हा स्वभावच असा. जन्मतःच म्हातारपण आलेलं ! असा कंजूष शब्दाच्या बाबतींत, पंचवीस प्रश्न करावे तेव्हां एक उत्तर यायचं ! नाहीं दादा ? ( पुन्हां दाराकडे जात ) करता आहां काय अण्णा ? दादा आलाय म्हणतें ना ?—( पुन्हां बाहेरच्या दाराजवळ येऊन ) हें सामान पडलंय इथंच ! मेले हे हमाल भारीच मिजासखोर ! नि घरांत गडी नाहीं ! काय जाळायची आहे ही श्रीमंती ! पैसा देऊनसुद्धां गडी मिळत नाहीं म्हणजे काय ! ( तारेला ) ये, जरा हात लाव, हें सामान आंत नेऊन ठेवूं आपण ! ( दत्ताला ) बरं का दादा,

तश्शीच ठेवलीय् खोली तुझी. तें टेबल, ती बुकांचीं कपाटं, त्या तसबीरा, खुर्च्या, पलंग—अगदीं जिथल्या तिथं आहेत ! ये ना तारा, जरा हात लाव.

[ त्या दोघीही त्याचें सामान उचलून नेऊं लागतात तोंच आंतल्या दारानं अण्णासाहेब प्रवेश करतात. वय सुमारें साठीजवळ, गंभीर चेहरा, दत्ताच्या चेहऱ्याशीं पुष्कळसें साम्य असलेला. आंत येतांच त्याची नजर दत्तावर जाते. दत्ता चट्कन् उठून उभा रहातो. ]

**अण्णा०:**—( गहिंवरल्या आवाजानें ) दत्ता—आलास ?

[ दत्ता संथपणें जाऊन त्यांच्या पायावर डोकें ठेवतो. अण्णासाहेब त्याला उचलून हृदयाशीं घट्ट कवटाळून धरतात. त्यांच्या डोळयांतून मोठमोठीं आसवें गळत आहेत ]

**अण्णा०:**—आलास !—आलास ! ! कसा रे असा निर्दय झालास दत्ता ! दहा वर्षे !—( त्याला धरून खुर्चीवर बसवीत ) ये, बैस इथं ! त्याच्या डोक्यावरून हात फिरवीत ) दहा वर्षे !—तरुणांना पळासारखीं वाटतात हीं दहा वर्षे ! म्हाताऱ्याच्या मुठींतून वर्षे भराभर गळत असतात. पण तीं केव्हां ? जिकडे तिकडे समाधान नांदत असेल तेव्हां ! माझा एकुलता एक मुलगा तूं— अठराव्या वर्षी घर टाकून निघून गेलास—एवढासा बच्चा—एवढीं वर्षे परदेशांत काढलींस !—मराठी भाषा तरी ऐकूं येत होती का तिथं ?— ( धोतराच्या सोग्यानें डोळे पुसून टाकून ) आलास ? बरं झालं ! दहा वर्षांनीं का होईना पण शेवटीं एकदां घरीं यावंसं वाटलं तुला !—

**दत्ताः**—क्षमा करा मला. वैताग आला होता तेव्हां—

**अण्णा०:**—आतां एक शब्द सुद्धां बोलूं नकोस. पूर्वीच्या गोष्टी काढायच्या नाहींत. कांहीं बोलायचं नाहीं. अगदीं धुऊन पुसून नाहींसं होऊन गेलंय तें ! रमा ! ( आंतून रमा " आलें अण्णा ! " म्हणते ) चहा ठेवायला सांगितलास का ?

**रमाः**—( तारेसह बाहेर येत ) चहा ठेवायला सांगितलास का म्हणे ! एवढं का मला कळत नाहीं ? बरं का दादा, तुझ्या खोलींत नेऊन ठेवलंय सामान ! बरं का अण्णा, नुसती एक सूट केस न् एक होल्ड ऑल घेऊन आलाय दादा ! एवढाच का हा याचा संसार ? कीं पुन्हां जायचंय कलकत्त्याला ?

**अण्णा०**:—होय ? (दत्ता मानेनें नकार देतो) ठीक ठीक! आतां दत्ता इथंच रहायचा बरं का रमा!—इथंच रहायचा! कुठं जायचा नाहीं या म्हाताऱ्याला सोडून—नि आपल्या या छोट्या बहिणीला!—होय ना ?

**दत्ता**:—( अर्धवट स्वगत ) छोट्या बहिणीला! (एक सुस्कारा सोडतो)

**अण्णा**:—होय छोट्या बहिणीला! आतां कोण आहे तिला तुझ्याशिवाय? मी हा असा म्हातारा—आज आहें, उद्यां नाहीं—तुझी आई आधींच गेलेली—तिलाही आई नाहीं—भावंड म्हणायला तिला तूं न् तुला ती! आतां कोण आहे तिला तुझ्याशिवाय ?

**रमा**:—( अण्णाच्या तोंडावर हात ठेवून ) आतां पहा हं असं भलतंच कांहीं बोलाल तर!

**अण्णा०**:— भलतंच कसं रमा! काळाची गति कांहीं कुणाला थांबवतां येत नाहीं! तरणीं माणसं डोळ्यासमोरून गेलीं, कीं म्हातारा जीव साशंक होतो स्वतःच्या आयुष्याबद्दल. आज दत्ता परत आला—केवढं समाधान वाटलं मला! आतां केव्हांही मरायला मोकळा झालों! ( रमा त्याच्या तोंडावर हात ठेवते, तो तिचा हात दूर करून ) माझ्या तोंडावर हात ठेवशील—माझं तोंड बंद करशील—पण काळाचा फास तोडायचं बळ कुठून आणशील या चिमुकल्या हातांत ? जा आतां चहा घेऊन ये. झाला असेल इतक्यांत तयार! किती वेळ बसून राहिला आहे दत्ता! ( रमा जाते ) पाहिलंस तारा, हें असं आहे. मोठी भाग्यवान आहेस तूं! तुझे आईबाप आहेत, दोन मोठीं भावंडं आहेत, चार लहान भावंडं आहेत. उद्यां मी गेलों तर कोण आहे माझ्या रमाला पहायला असं वाटत होतं मला. आज माझा जीव खालीं पडला!

**तारा**:—मी होतें ना ? रमा कांहीं मला परकी नाहीं. तीं चार भावंडं आहेत तशीच रमा. तिला उणीव होती काय ती माणसांचीच! एवढी ही धनदौलत आहे—शिवाय तिचं आतां लग्न ठरलंच आहे ना हेमंतशीं ?

**दत्ता**:—( एकदम दचकून ) हेमंतशीं ?—कुठला हेमंत ? हेमंत पंडित ?

**तारा**:—हो!

**दत्ता**:—हेमंत पंडितशीं रमाचं लग्न ठरलंय ?

**अण्णा०**:—हो! असा काय पहातोस दत्ता ? हेमंत पंडितबरोबर रमाचं लग्न

ठरलंय. एकमेकांच्या आवडीनं ठरलं. तें तुम्हां नव्या लोकांचं प्रेम का काय म्हणतात तें सुद्धां जुळून गेलंय--

**दत्ताः**—( अर्धवट स्वगत ) हेमंतशीं रमेचं लग्न ठरलंय ? ( एकदम अण्णाकडे बघून ) त्याला माहीत आहे ?

**अण्णा०ः**—( डोळ्यानेंच दटावून ) माहीत काय असायचं ? दोन्हीं घराण्यांचा पहिल्यापासूनचा घरोबा—पूर्वीपासूनच कांहीं ना कांहीं तरी नात्याचे लागेबांधे आहेतच—त्यांतच आतां ही नवी गांठ—

**दत्ताः**—( पुन्हा अर्धवट स्वगत ) हेमंतशीं लग्न ठरलंय !

**अण्णा०ः**—आतां उगी रहाशील दत्ता !

**ताराः**—( दत्ताला ) असं काय म्हणतां ? कांहीं व्यंग आहे का यांत ?

**दत्ताः**—( हंसण्याचा प्रयत्न करीत ) छे छे तसं कांहीं नाहीं ! लहानपणापासून हेमंतचं माझं पटत नसे. कांहींतरी अगदींच क्षुल्लक कारणावरून भांडण झालं होतं त्याचं न् माझं—ते शेवटपर्यंत आम्हीं बोललों नाहीं एकमेकांबरोबर ! —आतां तो इथं आला—येतो ना तो इथं ?

**ताराः**—हो तर ! यायचाच तो इथं ! आतां ते कांहीं पूर्वीचे दिवस नाहींत. आतां आम्हीं नवीं माणसं–लग्न झालं नाहीं तरी लाजत नाहीं कांहीं एकमेकांना–

**दत्ताः**—म्हणजे, तुमचंही लग्न ठरलंय वाटतं ? कुणाशीं ?

**अण्णा०ः**—( मोठयानें हंसून ) छे छे, ती मोकळी आहे अजून ! तुला माहीत आहे, आपले ते आप्पासाहेब राजाध्यक्ष, त्यांची ही मुलगी । त्यांचं आपलं गोत्र जुळतंय बरं का ! ( पुन्हा मोठमोठयानें हंसून ) लाजूं नकोस तारा. माझ्या सुद्धां मनात होतं तें—अगदीं पहिल्याच गांठीभेटीला बोलतोंय म्हणून आश्चर्य वाटेल तुला. मला वारंवार वाटे, तूंही इथं येतेस—रोज येतेस—अगदीं घरची वाटतेस—रमा आतां जायची तेव्हां मला वाटे, दत्ता इथं असता, त्याला पटलं असतं, तर रमा गेली तरी तारा इथं राहिली असती—

**ताराः**—( हंसायचा प्रयत्न करीत ) चला !—अजून कसा चहा आणला नाहीं हिनं ? पहातें हं ! ( जाते )

**दत्ताः**—आप्पासाहेबांची मुलगी का ही ? मोठी गंभीर दिसते ! रमेचं हिचं कसं जुळतं ?—

**अण्णा०ः**—हें पहा दत्ता—( गंभीर होऊन ) एक सांगायचं आहे तुला—

आत्तांच एक मोठी चूक करीत होतास—चट्कन् बोलून जाणार होतास—समजलास ? तें कांहीं बोलायचं नाहीं—चुकूनसुद्धां उल्लेख करायचा नाहीं त्या गोष्टीचा ! तिला कांहीं माहीत नाहीं—त्या अजाणतेपणाच्या समाधानांत सुखांत राहूं दे तिला ? एवढी भीक मला घाल ! शेवटचं मागणं आहे तुझ्या-जवळ माझं हें !

**दत्ता**:—( गर्हिवरून ) अण्णा !—

[ रमा आणि तारा एकेक ट्रे हातांत घेऊन येतात. रमेच्या ट्रे मधें फराळाचे जिन्नस आणि तारेच्या ट्रे मधें किटली वगैरे चहाचें सामान आहे. कोपऱ्यांतल्या एका टीपॉयवर दोन्हीं ट्रे ठेवून दोघीही ती ट्रे उचलून आणून दत्ताच्या समोर ठेवतात. अण्णा आणि दत्ता त्यांना पहातांच चट्कन् डोळे पुसून घेतात आणि हंसण्याचा रडवा प्रयत्न करतात. रमा चहा तयार करूं लागते. ]

**रमा**:—हं आतां कर आधीं खायला सुरवात ! जळ्ळी मेली ही लढाई ! गडी माणसं मिळायची केवढी पंचाईत झालीय. जो उठला तो गिरणींत जातो. ऐंशी ऐंशीं, नव्वद नव्वद रुपये मिळतात ना तिथं—आतां कोण येतोय इथं दहा बारा रुपयांसाठीं ! बी. ए. झालेल्या माणसालासुद्धां नाहीं मिळत एवढा पगार ! आतां ही **त्यांची** अमदानी सुरू झालीय—पुढं शूद्रांचं राज्य सुरू होणार, म्हणून कुठंसं म्हटलं होतं स्वामी विवेकानंदांनीं, तें अगदीं खरं वाटूं लागलंय मला आतां. ( पाहून ) बसलायस काय स्वस्थ ? कर ना खायला सुरवात. कीं तोंडबिंड धुवून यायचंय ? इतका मागासलेला राह्यलायस का अजून ?

**दत्ता**:—( बळेंच हंसून ) छे छे, तूं चहा कसा तयार करतेयस तें पहात होतों. ( खाऊं लागतो ) सारं नवं आहे ना हें मला ! खाणावळींत रहात होतों आजवर—आणि त्या सुद्धां बंगाली खाणावळी—कंटाळलों न् गेलों इंग्रजी हॉटेलांत. तिथं ट्रे नुसती पुढं यायची—स्वतः चहा करून घ्यायचा—आपल्यासाठीं कुणीतरी चहा करून देतंय असं हें आज पहिल्यानंच.

**अण्णा०**:—पहिल्यानंच कां ?—( मोठ्यानें हंसून ) दुसऱ्यानंसुद्धां होईल—काय तारा ?

**रमा**:—( चट्कन् वळून पाहून ) म्हणजे ?

**अण्णा०**:—म्हणजे काय तें एव्हां बोलायचं नाहीं—काय दत्ता ? ( पुन्हां

मोठयानें हंसतो ) तें आमचं गुपित आहे. काय तारा ? आमचं गुपित आहे तें—एव्हां सांगायचं नाहीं तें तुला !—

**रमा**ः—कळतं मला ! कांहीं नको सांगायला. पण तें इतक्यांत अगदीं धूळ-भेटीला जमून जाईल असं नव्हतं मला वाटलं. आतां चल दादा आंत. जरा स्नानबिन करून घे. मेला गडी नाहीं त्यानं जीव अगदीं बेजार झाला आहे ! ये आंत ! ( दत्ता उठून आंत जातो. रमा त्याच्या मागोमाग जाते. )

**अण्णा०**ः—पाह्यलास आमचा दत्ता—अगदीं लहानपणीं होता तसाच आहे अजून—अगदींच गंभीर आहे ! आईच्या वळणावर गेलाय आपल्या. तुझ्या स्वभावाला अगदीं मिळता आहे त्याचा स्वभाव ! जरा थोडा परिचय होऊं दे त्याचा तुझा—म्हणजे समजेल तुला आपोआप ! तसा अबोल असला तरी मनाचा मोठा गोड आहे तो ! ( तिच्याकडे क्षणभर रोखून पाहून ) कां ? बोलतशी नाहींस ?

**तारा**ः—काय बोलूं इतक्यांतच ?

**अण्णा०**ः—ठीक ठीक ! म्हणजे थोडा अवधि जायला हवाय—होय ना ? हें पहा तारा, मी अगदीं आशेला आलोंय ? एवढी ही धनदौलत, गडगंज भरलंय घर, पण माणसं नाहींत घरांत ! तेंच मोठं जाणवतं मला ! तुम्हां मुलांना एव्हां कळायचं नाहीं तें. आयुष्याची दोरी तुटतेसं वाटूं लागलं कीं नव्या माणसांचे धागेदोरे जोडले जावेसे वाटतात. तेवढाच सूतभर आधार ! मोठं वाईट आहे जिणं हें ! असं वाटत होतं मला, घरभर माणसं असावीं—स्वतःचे मुलगे, मुली—त्या मुलांचीं मुलं, त्या मुलींचीं मुलं !—( हंसायचा प्रयत्न करीत ) पण आतां हें असं झालंय ! मी न् रमा—आतां हा दत्ता आला. एकटाच आला पण घर कसं भरून आलंसं वाटलं—नाहीं ?

**तारा**ः—मला चांगला अंदाज येतोय तो—भरलेलं घर आहे ना आमचं ? —धनदौलतीनं नव्हे, माणसांनीं ! चालत्या बोलत्या माणसांची दौलत फार मोठी असते या असल्या दौलतीपेक्षां !

**अण्णा०**ः—खरंय् तें ! तुला कळतंय् तें—रमेला तें कळत नाहीं. एकटीच वाढलीय ना ती पहिल्यापासून इथं ! तीच संवय आहे तिला ! ( बाहेर घंटा वाजते ) कोण आलंय—पहा पाहूं.

[ तारा जाते. अण्णासाहेब अस्वस्थ होतात. सीतेला घेऊन तारा येते.

सीता ही एक अनाथ मुलगी आहे. रमेच्याच वयाची. नुकतीच कॉलेजांत जाऊं लागलेली. रमेच्या मानानें अभ्यासांत मागासलेली. पोषाखांत छिचोर-पणाची जरा अधिकमात्रा दिसून येते. भाषणांत थोडीशी कृत्रिमता--मोकळेपणा एकंदरींत कमीच. ]

**अण्णा०**:—( सीतेला पहातांच ) तूं आलीस होय ? तुला कशाला घंटा वाजवायला हवी ? किती वेळ सांगितलं तुला, कीं परक्यासारखी वागूं नकोस इथं ! मला वाटलं हेमू आला.—आज दत्ता आलाय आमचा ! आठवतो ना तुला ?—आमचा दत्ता—मोठा मुलगा माझा ? आज दहा वर्षांनीं आला परत ! रमा गेलीय त्याच्याच सरबराईला ! बैस ना, उभी कां राह्यलीयस ? न् तूंही बैस ना तारे ! अशा कशा रे तुम्ही पोरी या ? किती वेळ सांगायचं तुम्हांला ?

**तारा**:—वडिलांचा मान राखला पाहिजे ना ?

**अण्णा०**:—वडिलांचा मान म्हणे ! बैस ना सीता !—कसला आलाय् वडिलांचा मान ? तीं जुनी ढोंगं आवडत नाहींत मला. कसं खेळीमेळीनं राह्यलं पाहिजे लहानमोठ्या माणसांनीं. असे आहेत हे आजकालचे दिवस. कशाला आली होतीस ?—( ती क्षणभर उभीच रहाते ) बोल ना ! तशी तारा कांहीं आपल्याला परकी नाहीं—काय आहे ?

**सीता**:—फी भरायची आहे कॉलेजची !

**अण्णा०**:—( हंसून ) खरंच की ! कसा विसरलों मीं ! शेवटीं तुला आठवण द्यावी लागली मला. असं होतं हें माझं अलिकडे ! अगदीं मुद्याची गोष्ट तेवढीच अचुक विसरतों ! थांब हं ! ( असें म्हणून उठून जातो. )

[ तारा आणि सीता दोघीही एकमेकींकडे पहात क्षणभर स्तब्ध रहातात. कुणीच बोलत नाहीं. ]

**सीता**:—केव्हां आला रमेचा दादा ?

**तारा**:—आजच ! आतांच—एक घटकाभऱ्यापूर्वीं ! तूं ओळखतेस वाटतं त्याला ?

**सीता**:—तशी अंधुकशी आठवण आहे मला. लहानपणापासूनच मी इथं येतेंय कीं नाहीं—पण आतां समोर पाह्यला तर चट्कन् ओळख पटेल असं नाहीं वाटत मला ! फारसा मिसळत नसे तो आम्हां मुलींत ! एकप्रकारचा

राग असे त्याचा आम्हां दोघींवर—म्हणजे रमेवर नि माझ्यावर! कांहीं कारण नव्हतं त्याला तसं—पण त्याचा स्वभावच तसा विचित्र होता त्यावेळीं! रमेची न् माझी तेव्हां फार गट्टी असे—

**तारा:**—म्हणजे आतां नाहीं वाटतं?

**सीता:**—असंच कांहीं नाहीं! पण आतां मीच रहातें माझी पायरी राखून. किती झालं तरी मी यांची आश्रित—अण्णासाहेबांची कृपा आहे म्हणूनच माझा अभ्यास चाललाय्. म्हणूनच अन्न मिळतंय मला. नाहींतर आज कुठल्या नरकांत जाऊन पोंचलें असतें देव जाणे!

[ रमा घाईघाईनें बाहेर येते ]

**रमा:**—दिली एकदां दादाची तरतूद लावून—[ सीतेला पाहून ] तूं आली आहेस होय? हे पहा सीता, तुला काय हवं असलं तर पत्र पाठवीत जा अण्णांना—जेव्हां तेव्हां अशी येत जाऊं नकोस इकडे. हेमूला आवडत नाहीं तें!

**तारा:**—कां?

**रमा:**—नायकिणीची मुलगी आहे ना ही! सभ्य माणसांच्या घरांत—

**सीता:**—नायकिणीची नव्हे—कलावंतिणीची!

**रमा:**—नायकिणीची काय न् कलावंतिणीची काय, एकूण एकच!

**सीता:**—नाहीं रमूताई—

**रमा:**—मला ताई म्हणत जाऊं नकोस—कितीवेळ सांगितलं तुला? मी नाहीं कुठल्या नायकिणीच्या मुलीची ताई—! कलावंतीण म्हणे! हल्लीं हे मेले लेखकसुद्धां स्वतःला कलावंत म्हणवून घेतात. पण त्यांच्या बायकोला कलावंतीण म्हटलं तर रुचेल का त्यांना? (स्वतःच्याच कोटीवर खूष होऊन हंसत) ते आपल्याला कलावंत म्हणवतात म्हणून ही स्वतःला कलावंतीण म्हणवून घेते.

**सीता:**—नाहीं बरं ताईसाहेब! अनादि काळापासून आम्हीं कलावंत आहोंत! पापं असलों तरी तीं देवाच्या पायरीजवळचीं! देवाघरच्या लेकी सूना आहोंत आम्हीं. असं हिणवूं नये देवाघरच्या माणसांना!

**रमा:**—देवाघरचीं माणसं म्हणे! पापाच्या खाई म्हणजे तुम्हीं नायकिणी—

**अण्णा०:**—(प्रवेश करतांना दाराशीं मोठ्यानें) रमा!—(पुढें येऊन)

रमा, हें बरं नव्हे ! कुळीथळी काढूं नये कुणाची ! कुणाच्या हातीं असतं का तें ? हिनं स्वत: मागून घेतला होता का हा जन्म ? हीन जातींत जन्म यावा असं कधीं कुणाला वाटलंय ?—एवढाच कसा हा कठोरपणा आलाय तुझ्या अंगीं ?

**रमा**:—( ओशाळून ) हेमूला आवडत नाहीं ना तें !

**अण्णा०**:—हेमूला आवडत नाहीं म्हणे ! ऐकलंस तारा ? एव्हांपासून हेमूच्या सुराला सूर देऊं लागलीय ही ! पूर्वी किती दोस्ती होती या दोघींची ! कुणी म्हणावं बहिणी बहिणीच—

**रमा**:—( पुटपुटत ) बहिणी बहिणीच !

**सीता**:—( रडकुंडीला येऊन ) आतां रमूताईसुद्धां म्हणूं नको म्हणते मला ! एवढीं वर्षें जिभेला खिळलेलं नांव—असं एकदम कसं धुवूनपुसून टाकूं ?

**अण्णा०**:—होय रमा ? रमूताई म्हणूं नको असं म्हटलंस तूं हिला ? देवाच्या दयेनं तुला वैभव लाभलंय—वैभवांत माणसानं मन मोठं ठेवलं पाहिजे ! दीनदुबळ्यांची ताई झालं पाहिजे—आई झालं पाहिजे ! तूं कांहीं पुरुष नाहींस ! आईची जात विसरतां कामा नये तुम्हीं पोरींनीं ! ( सीतेच्या हातीं नोटा देत ) या घे. आणखी कांहीं हवं असलं तर उद्यां कळव मला. उगीच आबाळ करूं नकोस आपल्या जिवाची. मरतांना तुझ्या आईला मी वचन दिलंय !—अन् असं पहा, रमूताईच म्हणत जा हिला ! ऐकलंस रमा, कांहीं बिघडत नाहीं त्यांत ! हेमू गाढव आहे ! झब्बू लोकांत वावरतो म्हणून भलत्याच कल्पना शिरल्यायत त्याच्या डोक्यांत ! मी काय असभ्य आहें ?—हलकट आहें ?—मला जें पटतं तें तुम्हां पोरांना कां पटूं नये ?—

[ बाहेर पुन्हां घंटा वाजते. थांबून सारीं ऐकतात. ]

**रमा**:—हेमू आला वाटतं ! ( सीतेला ) तूं जा पाहूं आतां इथून.

**अण्णा०**:—कांहीं नको जाऊंस ! बैस तिथं !

[ पुन्हां घंटा वाजूं लागते. तारा बाहेर जाते. सारींजणें दाराकडे पहात रहातात. तारा आंत येते. तिच्या मागोमाग एक तरुण येतो. खादीची मळकी कोपरी घातलेला, गुडघ्यापर्यंत खादीची मळकी चड्डी, डोक्याला खादीची एक मळकी टोपी, मुद्रा तेजस्वी पण आंत येतांना अगदीं चोरासारखा येतो आणि अण्णासाहेबांच्या समोर बऱ्याच दूर अंतरावर राहून

हातानें नमस्कार करतो, एक क्षणभर थांबतो आणि तसाच पुढें जाऊन अण्णासाहेबांच्या पायावर डोकें ठेवतो. ]

**अण्णा०**:—ऊठ ऊठ ! कोण तूं ?

**पांडू**:—मी एक अनाथ अपंग माणूस आहें रावसाहेब ! [ उठून अदबीनें दूर राहून ] नोकरीसाठीं आलोंय आपल्यापाशीं.

**अण्णा०**:—कसली नोकरी ?

**पांडू**:—कसलीही—पोटभर अन्न आणि आंगभर कपडा मिळण्याइतकी !

**रमा**:—घरकाम करशील ? धुणीं धुणं, भांडीं घांसणं ?

**पांडू**—तोच आहे माझा पेशा !

**रमा**:—पण बोलतोस चांगला शिकल्यासवरल्यासारखा !

**पांडू**:—लहानपणापासून बामणांच्याच घरांत वाढलोंय मी ! आतां ते गेले पेन्शन घेऊन आपल्या गांवीं ! चार दिवस झाले—घांसभर अन्नाला मोताद झालों या भरल्या मुंबईत !

**रमा**:—गिरणींत नाहीं गेलास नोकरीला ? चांगला भरगच्च पगार मिळतो ना तिकडे !

**पांडू**:—त्यापेक्षां उपाशी मरेन फुटपायरीवर पडून ! गिरण म्हटली कीं माझं माथं फिरतं ! माझी आई मेली या गिरणीच्या पायीं.—मिळेल का नोकरी इथं ? पडेल तें काम करीन. एवढी सुद्धां हयगय व्हायची नाहीं माझ्याकडून. चार दिवस नोकरी करून घेऊन पहा. पटलं तर ठेवा, नाहीं तर आहेच फुटपायरीचा कुसवा ! मरायचंच तर आपल्या सारख्या दीनदुबळ्यांच्या दात्याच्या पायाशीं मरेन पण ती गिरण नको.

**अण्णा०**:—काय ग रमा ?

**रमा**:—हवाच आहे गडी आपल्याला न् आतां दादा आलायू !

**पांडू**:—मग लागूं कामाला ?

**अण्णा०**:—नांव काय रे तुझं ?

**पांडू**:—( कांचरत ) माझं नांव होय ?—माझं नांव—

**रमा**:—माझं नांव, माझं नांव, काय करतोयस ? खोटं नांव सांगायचंय वाटतं ? कीं तुरुंगांतून सुटून आलायस ?

**पांडू**:—होय ताईसाहेब !

रमाः—तुरुंगांतून सुटून आलायस ? नी इथं येतोस नोकरी मागायला !

पांडूः—तसा कांहीं गुन्हा केला नाहीं मी. तिरंगी झेंडा घेऊन जात होती एक मिरवणूक—त्यांनीं चार आणे दिले मला झेंडा धरण्यासाठीं. साऱ्या-नांच पकडून नेलं पोलिसांनीं. सहा महिने फुकट जेवायची सोय झाली. पांचच महिन्यांनीं घालवून दिलं त्यांनीं मला बाहेर—चांगल्या वागणुकीचा म्हणून—मी राह्यला खूष होतों आणखी वर्ष दोन वर्षं—पण त्यांनीं लावून दिलं मला बाहेर. बरी सोय झाली होती, काम करावं नि पोटभर जेवावं. रेशन कार्ड मागत नव्हता कुणी. आतां रेशन कार्डाशिवाय जेवण मिळत नाहीं ना कुठं ? तेव्हां कुठं तरी तसलीच मिरवणुक सांपडेल म्हणून बघत होतों, पण आतां म्हणे मिरवणुका बंद झाल्यायत ! तीही आशा खुंटली म्हणून आलोंय आपल्यापाशीं—

अण्णा०:—बरं, बरं, जा जाऊन कामाला लाग. काय पगार हवा तुला ?

पांडूः—अन्न वस्त्र मिळालं कीं भरपूर झालं मला.

ताराः—अन् विडी पानसुपारीसाठीं नको का कांहीं ?

पांडू-—तसल्या कांहींच संवयी नाहींत मला. पोटभर जेवायला मिळालं कीं बस्स् झालं.

ताराः—अगदींच विलक्षण दिसतो हा ! नाहीं तर रामा म्हटला कीं सारखी त्याची चंची सुटलेली असायची !

पांडूः—मी त्यांतला नव्हे ताईसाहेब !—मग लागूं कामाला ? काय करूं आधीं ? केर काढूं इथला ? झाडू कुठं आहे ?

अण्णाः—अगदींच घाईला आलाय बेटा ! जा सीता, त्याला आंत घेऊन जा बाईकडे ! बाईंना म्हणावं आधीं त्याला पोटभर खायला घाला न् मग काय काम करायचं तें त्याला दाखवून द्या. ( तो आंत जाऊं लागतो ) अरे थांब ! तुझं नांव सांगायचं राह्यलंच कीं ?

पांडूः—माझं नांव—पांडू—पांडू कृष्णा सजणगे !

सीताः—ये रे पांडू !

[ सीता आंत जाते. पांडू तिच्या मागोमाग जातो. ]

रमाः—दादाचा पायगुण मोठा सुंदर दिसतो. त्याच्याच भाग्यानं आज गडी मिळाला. नाहीं तर अशी बेजार झालें होतें गडी नव्हता म्हणून ! बरं

का तारा, गेले पंधरा दिवस स्वतःच्या साड्या मी स्वतः धुतल्या. एवढाच हा एक पुण्यवान् प्राणी दिसला गिरणींत न जाणारा !

**अण्णा०**:—छान झालं ! आतां कांहीं काळजी नको. नाहीं तर या दत्ताच्या विजारी तुला धुवाव्या लागल्या असत्या. ( तारा हंसते ) हंसतेस काय तारे ! त्यांत कांहीं मोठं कठीण नाहीं. लहानपणीं आमचीं धोतरं आम्हींच धूत होतों. शिस्तच होती ती आमच्या घरची ! आतां ही श्रीमंती आली म्हणून हे चोचले चालू झालेयत् ! भाग्य म्हणा कीं दुर्भाग्य म्हणा पण हें वैभव तुम्हां पोरांचं आहे. [ पुन्हां घंटा वाजते ]

**रमा**:—आतां मात्र हेमूच. अगदीं वाईट खोड आहे त्याला ही ! थांब तारा, जाऊं नकोस. येऊं दे त्याला आंत. ( पुन्हा घंटा वाजते तेव्हां मोठ्यानें ) कोण आहे ? [ बाहेरून हेमंत म्हणतो, " मी तो ! " ]

**रमा**:—मग ये ना आंत. दार उघडं आहे तें दिसत नाहीं वाटतं ?

[ हेमंत येतो. साधारण दत्ताच्याच वयाचा. अद्ययावत् साहेबी थाटाचा पोषाख केलेला. कुरेंबाज. बोलण्यांत आखडू—इंग्रजी ढंगानें मराठी बोलणारा —देखणा—रुबाबदार. ]

**हेमंत**:— ही कांहीं शिस्त नव्हे रमा—[ अण्णासाहेबांना पाहून ] माफ करा हं. मला वाटलं रमू एकटीच आहे. न् ताराही आहे वाटतं इथं ?

**रमा**:—आणखी एक माणूस आलंय् आज !

**हेमंत**:—कोण ? ती नायकिणीची मुलगी वाटतं ?

**रमा**:—ती तर आहेच ! पण त्याशिवाय आणखीही एक माणूस आलंय्.

**हेमंत**:—गडी मिळालाय वाटतं ?

**रमा**:—गडीही मिळालाय. पण हें माणूस अगदींच निराळं आहे. ओळख पाहूं कोण तें ! [ आंतल्या दारानें दत्ता येतो—त्यानें कपडे बदलले आहेत. बंगाली पद्धतीनें धोतर नेसलेला—अंगांत एक रेशमी बंगाली सदरा. ]

**रमा**:—पहा !

**हेमंत**:—कोण ?

[ हेमंत व दत्ता एकमेकांसमोर येऊन एकमेकांकडे पहात तटस्थ उभे रहातात ]

**अण्णा०**:—अरे पहातां काय एकमेकांकडे ? ओळखलं नाहींस हेमू ? आतां विसरा तो जुना अबोला ! सारं कांहीं धुवून पुसून गेलंय या दहाबारा वर्षांत.

दत्ताः—हेमू !
हेमंतः—दत्ता ! [ रमा पुढें येऊन त्या दोघांचे हात जोडून देते ]
रमाः—सुट्टयो ! झालं ? आतां मागलं तें काढायचं नाहीं बरं का तुम्हीं दोघांनीं ! बाळपणांतून एकदम तारुण्यांत उडी मारायची ! बरं का तारा, दादानं एक पुस्तक घेतलं होतं हेमूकडून लहानपणीं, ते वेळीं परत दिलं नाहीं म्हणून मांडले दोघे. मला वाटतं वीस वर्षें झालीं असतील त्याला—नाहीं दादा ?—
दत्ताः—( रुक्षपणें ) एकवीस !
रमाः—बरं एकवीस ! एकवीस वर्षं झालीं त्याला—
हेमंतः—( बोटें घालीत ) नाहीं—एकोणीस !—
रमाः—बरं एकोणीस !
दत्ताः—नाहीं—एकवीस !
अण्णा०ः—अरे आपण तोड करूं वीसांवर—वीस वर्षं झालीं ! ( दत्ता बोलायचा प्रयत्न करतो त्याला ) गप्प रहा—वीस म्हणून ठरलं ना एकदां !
हेमंतः—बरं बरं वीस !
दत्ताः—नाही—( निश्चयानं ) एकवीस ! एकवीस वर्षं दोन महिने नऊ दिवस ! मी आतां हिशेब करून पाह्यला.
रमाः—बरं बरं कळलं—आतां उगी रहा ! काय बोलत होतें तें विसरूनच गेलें मी ! चला, जाऊं द्या, नकोतच त्या गोष्टी ! या आतां बसा इथं दोघेही ! ( त्यांना बसवते )
अण्णा०ः—आतां चहा !
रमाः—हो, चहा ! कुणाला तरी चहा द्यायची वाटच बघत असतां तुम्हीं ! असा वारंवार चहा घेऊं नका म्हणून डॉक्टर बजावतात त्याची आठवण आहे का ?— तूं बैस ना तारा, तूं कां उभी राहालीयस ? ( आठवण करीत ) कोण बरं तो—
ताराः—पांडू—
रमाः—हो पांडू—( हांक मारते ) पांडू—पांडू !

[ हातांत चहाचा कप घेऊन पीत पीत पांडू येतो त्याला रमा डोळ्यानें खूण करते. घाबरल्यासारखें पाहून तो हातांतला कप हळुच दाराच्या आड ठेवतो व पुढें येऊन ‘ जी ’ म्हणतो. ]
रमाः—चहा घेऊन ये.!

[ पांडू बोटानें माणसें मोजूं लागतो, रमा त्याला डोळ्यानें दटावते. ]

**रमाः**—पांच कप ! ( तो जाऊं लागतो ) थांब थांब ! चारच आण. मला नको चहा !

**हेमंतः**—नाहीं, नाहीं, पांचच कप आण !

[ " पांच कप, पांच कप " म्हणत पांडू जातो. ]

**हेमंतः**—जरा धांदरटच दिसतो हा तुझा गडी रमू !

**ताराः**—मिळाला हेंच भाग्य आधीं ! नाहींतर स्वतः धुणीं भांडीं करीत होती रमा.

**हेमंतः**—( रमेला ) होय ?

**रमाः**—( होकारार्थी सारखी मान हालवीत ) संवय पाहिजे ना एव्हांपासून ?

**हेमंतः**—कां ? आमच्या घरीं गडीमाणसं नाहींत वाटतं ?

**रमाः**—समज उद्यां तुझी नोकरी गेली—

**अण्णा०ः**—( दरडावून ) रमा !

**रमाः**—बरं राह्यलं !

**ताराः**—नोकरी गेली तरी घरीं कांहीं तोटा आहे का कशाला ?

**रमाः**—समज, उद्यां आपण दोघंही भांडून निघालों घरांतून—

**अण्णा०ः**—आतां गप्प रहाशील रमा ?

**रमाः**—एवढ्या मोठ्या घरांत वावरण्यापेक्षां दोघंही. एकटींच राहिलों—कसं हेमू ? केवढं गजबजलेलं आहे तुझं घर ! तो माणसांचा गजबजाट, पोराबाळांचा कलकलाट, अगदीं सहन होत नाहीं मला ! लग्न झालं, कीं कांहीं तरी करून आपण भांडण काढूंच उकरून—अन् मग राहूं दोघंही एकटींच एक फ्लॅट घेऊन मरीनड्राइव्हवर !—तूं जाशील ऑफीसांत नि मी समुद्राकडे बघत राहीन कसलीं तरी गाणीं गात—अन् तूं ऑफीसांतून आलास—

**अण्णा०ः**—रमे आतां उगी राहशील ? कसलीं दरिद्री चिन्हं आठवतायत हीं तुला ?

**दत्ताः**—( स्वप्नाळूपणानें ) कांहीं काव्य आहे त्यांत ! गजबजलेल्या मुंबईत असाच कुठंतरी एकलेपणा सांपडायचा ! तूं भांडच रमा लग्न झाल्यावर !

**रमाः**—( अण्णासाहेबांना ) ऐका आतां !—

**अण्णा०ः**—काय ऐकतेस त्या बंगाली कवड्याचं ? हे बंगाली म्हणजे नुसते

सुस्कारे टाकीत बसायचे आकाशाकडे बघत! रडल्याशिवाय आयुष्यच नाहीं या बंगाल्यांचं—म्हणूनच आज मरतायत उपाशीं रस्तोरस्तीं! रडा म्हणावं काव्यं करीत.—अरे मी रडतोंय इथं घरांत शुकशुकाट म्हणून नि हीं पोरं बोलतायत एकलेपणाच्या गोष्टी! जुळीं झालीं पाहिजेत एकेकाला. दहावर्षांच्या आंत एक नाटक कंपनी उभी राहिली पाहिजे एका घरांतून! (सारे हंसतात) अरे हसतां काय मूर्खांनों—मासळीबाजार झाला पाहिजे घराचा—असं हें माझं घर पोराबाळांनीं गजबजलेलं पाहीन तेव्हांच मरेन. नाहीं तर—

**रमा**:—आतां उगी रहाल? जेव्हां तेव्हां मरायच्या गोष्टी कशाला बोलतां?

**अण्णा०**:—हें पहा रमा—अन् तूं रे हेमू—भांडण करायचं असलं तर करा, माझा त्याला विरोध नाहीं—पण भांडून निघालांत घरांतून तर इथं येऊन रहायचं!—काय दत्ता?—

**दत्ता**:—(चांचरत) इथं येऊन रहायचं! या दोघांनींही का?

**अण्णा०**:—तर काय मग?—हंडा एकीकडे अन् कळशी एकीकडे, असं कधीं झालंय्?

**दत्ता**:—ही बंगाली म्हण कुणी सांगितली तुम्हांला?

**अण्णा०**:—अरे ती आमची कोंकणी म्हण आहे—तेव्हां हेमू, एव्हांपासूनच हें आपण ठरवून टाकूं. (हेमंत हंसल्यासारखें करतो) बघ बघ रमा, हेमू हंसला. हंसायला येत नाहीं त्याला म्हणून म्हणतेस ना? तुम्हां तरुणांना कसं हंसवायचं तें आम्हां म्हाताऱ्यांनाच कळतं चांगलं—

[ पांडू हातांत ट्रे घेऊन येतो. आंत येतांच इकडे तिकडे पाहूं लागतो. तारा चट्कन् उठून टीपॉय आणून समोर ठेवते. पांडू चहाची ट्रे घेऊन पुढें येतो तोंच—]

**हेमंत**:—दूर दूर—कसला घाणेरडा माणूस ठेवलायस हा? या असल्या माणसाच्या हातचा चहा—

[ पांडू एकदम मागें होतो. दारांतून सीता येते आणि त्याच्या हातची ट्रे घेऊन पुढें येऊं लागते ]

**हेमंत**:—नि ही नायकीणीची मुलगी!

**पांडू**:—(हळुच) पण घाणेरडी नाहीं ना ती?

**हेमंत**:—(मोठ्यानें ओरडून) गप्प बैस!

[ रमा तिच्या हातची चहाची किटली घेऊन स्वतः आणून टीपॉयवर ठेवते आणि चहा करूं लागते. पांडू आणि सीता दाराशीं उभीं राहून बोलतात ]

**पांडूः**—असं आहे हें ! मी घाणेरडा म्हणून नको—तूं बरी दिसतेस म्हणून नको. घरच्या मालकिणीनं काम करायचं नाहीं म्हणून गडी ठेवला पण बिचारीच्या कपाळची कटकट कांहीं चुकत नाहीं ! ढवळतेच आहे कीं चहा. असं आहे हें श्रीमंतीचं दैन्य !

**अण्णा०ः**—काय रे, काय पुटपुटतोयस ?

**पांडूः**—( अदबीनं ) धन्यांनीं कामं करायचीं मग आम्हीं नोकर कशाला ?

**रमाः**—( चहा तयार करतांना ) अरे तुला रीत माहीत नाहीं. हा इंग्रजी एटिकेट आहे. घरच्या मालकिणीनंच चहा करून द्यायचा असतो—

**अण्णा०ः**—पूर्वीच्या काळीं अन्नशुद्धीचं तूप घरची मालकीण वाढीत असे ना—तसं !

**रमाः**—हो तसंच ! ( वळून पाहून पांडूला ) पहात काय उभा राहिलास ?

**पांडूः**—काय करूं ?

**रमाः**—जा आंत. बोलावलं कीं ये बाहेर—

[ तो आंत जाऊं लागतो. जातांना सीतेला आंत येण्याविषयीं खूण करतो. ती मानेनं नाहीं म्हणते. पांडू आंत जातो. ]

**सीताः**—( अण्णासाहेबांच्या मागें येऊन ) मी जाऊं आतां ?

**अण्णा०ः**—जा—अरे पण थांब, चहा घेतला नसशील तूं ! ( आपल्या हातचा कप तिला देत. ) हा घे. चहा घेतल्याशिवाय जाऊं नकोस !

**सीताः**—अन् तुम्हाला ?

**अण्णा०ः**—मला नको ! मला फार झालाय चहा सकाळपासून ! होय ना रमा ?

[ पांडू रिकामीं कपबशी घेऊन दाराशीं येतो. आणि तारेला खूण करून बोलावतो. तारा उठून त्याच्या हातचा कप आणून टीपॉयवर ठेवते आणि चहा तयार करूं लागते. पांडू आंत जातो. ]

**अण्णा०ः**—अगदीं थोडा हं—अर्धाच !

**हेमंतः**—( दत्ताला ) आतां इथंच रहाणार ना तुम्हीं ?

**अण्णा०ः**—अरे तुम्हीं काय म्हणतोस त्याला ? बरोबरचीं पोरं तुम्हीं—

**दत्ताः**—हो इथंच रहाणार मी. आमच्या कलकत्त्याच्या फर्मनं मला इथं एजंट म्हणून नेमलंय.

**अण्णा०**:—नाही—नाहीं—नाहीं—नोकरी करायची नाहीं कुणाची! धंदा करायचा असला तर स्वतःचा धंदा म्हणून कर. औषधांना आतां फार किंमत आलीय! एम्. एस्सी. झालायस तूं—इथंच काढूं आपण एक भला मोठा कारखाना. अन् हेमूलाही घेऊं आंत भागीदार म्हणून.

**हेमंत**:—छे छे, मला नाहीं तें तसलं कांहीं आवडत! सेक्रेटरीएट मधली एवढी मानाची नोकरी टाकून दुकानदार होणं मला नाहीं आवडायचं!

**रमा**:—आजच कशाला हव्यायत या गोष्टी! (हांक मारते) पांडू! (पांडू येतो) हे घेऊन जा.

[ सीता आपला कप नेऊन पांडूच्या हातीं देते, तो कप तसाच हातीं घेऊन पांडू तारेला खूण करून भांडीं, ट्रे घेऊन यायला सांगतो, ती खुणेनेंच त्याला घेऊन जायला सांगते. तो दोन पावलें पुढें येतो आणि हळुच विचारतो ]

**पांडू**:—चालेल का मी आलों तर?

**रमा**:—घेऊन जा म्हणतें ना हीं भांडीं!

**पांडू**:—होय ताईसाहेब—( असें म्हणून भराभर ट्रेमधें पेले ठेवून तितक्याच घाईघाईनें घेऊन जातो. )

**अण्णा०**:—मोठा गमत्या माणूस दिसतोय हा!

**रमा**:—गमत्या कसला, लबाड दिसतो गुलाम! तुरुंगांतून आलेला—

**हेमंत**:—म्हणजे? कशाला ठेवलास असला माणूस इथं?

**रमा**:—गुन्हा करून नव्हे. झेंडा घेऊन गेला होता मिरवणुकींत.

**हेमंत**:—एकूण एकच—गुन्हा म्हणजे गुन्हा! चोरी दरोड्यापेक्षां देखील हा गुन्हा फार भयंकर!

**अण्णा०**:—जाऊं द्या? आतां हें पाहून चालायचं नाहीं. कुणी तरी माणूस पाहिजे होता घरांत—

**तारा**:—बैस ना तिथं सीता—

**सीता**:—नाहीं—मी जातें आतां—( अण्णाला ) जाऊं ना?

**अण्णा०**:—कसली घाई आलीय? आज रहा इथंच जेवायला!

**हेमंत**:—ही? इथं जेवायला? मी जेवायला राहायलाच आलोंय अण्णासाहेब!

**अण्णा०**:—अरे जाऊं दे म्हणतों ना! आतां हें पहा रमा. जेवणाचं होई-पर्यंत एक—

ताराः—गाणं म्हण ! एकच—एक गाणं ! तुझ्या दादाला पाहूं दे तुझी तयारी !

दत्ताः—गातेस होय तूं ? हंः ! ( हेमंतला ) हिच्या गाण्याला हरकत नाहीं ना तुमची ?—

अण्णाः०—अरे पुन्हां तुम्ही आम्ही करूं लागलांत !

ताराः—म्हण ग तूं एक गाणं—

रमाः—काय म्हणूं ?—( गुणगुणत हळु हळू गाऊं लागते. गातां गातां अगदीं रंगांत येते. )

> जाग जाग भारता । कुठें तुझी स्वतंत्रता ? ॥ उजळली प्रभात या नभांत पूर्ण चित्प्रकाश सांचला । अवतरेल कोणि आस हे धरोनि श्वास थोर लोकसंघ नाचला । साउली दिसे नभांत झांकळे स्वतंत्र-तेज पाहतां । ग्रहण लागलें अचाट । रवि न दिसे, तम न दिसे । सकल जगत भरि विखुरत उधळली स्वतंत्रता । जाग भारता ॥ १ ॥

[ ती गात असतांना पांडू हातांत झाडू घेऊन येऊन केर काढूं लागतो ]

अण्णाः०—अरे—अरे—अरे हें काय ?

पांडूः—बाईनीं सांगितलं इथला केर काढायला.

अण्णाः०—चल नीघ इथून !

पांडूः—होय साहेब !

[ रमा पुन्हां गाऊं लागते. पांडू हातांत झाडू घेऊन आंतल्या दाराशीं उभा राहून ऐकत असतो. गाणें ऐकत असतांना त्याची दिनवाणी मुद्रा बदलून त्याच्या चेहऱ्यावर गंभीरपणाची छाया दिसूं लागते. सीता हळुच येऊन त्याच्या कानाशीं कांहीं तरी सांगते. तो दचकून एकदम आंत जातो. रमा गात असतांना दत्ताच्या डोळ्यांतून आसवें पाझरत असतात. हेमंत निर्विकार-पणें बसलेला असतो. पुन्हां पांडू दाराबाहेर येतो. गाणें संपतें. ]

पांडूः—( सद्गदित होऊन ) वाः ! छान् ! !

—पडदा—

# अंक दुसरा

[ स्थळ पहिल्या अंका प्रमाणें. पडदा वर जातो तेव्हां तिथें कुणी नसतें एका अनुक्रमांत तीन घंटा होतात. पांडू धांवत आंतून बाहेर येतो. बाहेरच्या दारांतून डोकावतो आणि कुणाला तरी यायला खूण करतो. तो वाट पहात असतां थोड्या वेळानें एक माणूस येतो. दोघेही एकमेकांच्या कानाशीं लागून बोलत बोलत पुढें येतात. तुमानीच्या खिशांतून कांहीं कागद काढून पांडू त्या माणसाच्या हातीं देतो. ]

**पांडू**:—या आठवड्याला हें एवढंच—एवढंच घेऊन जा. फार जपून रहा म्हणावं साऱ्यांना—फार चांगलं घर मिळालंय मला! माझ्या बापानं सुद्धां माझ्यावर एवढा लोभ दाखवला नव्हता—असा आहे हा इथला म्हातारा! या हेमू-रमूच्या लहरीपायीं मात्र बेजार झालोंय मी! दत्ता तसा बरा आहे—केव्हां केव्हां वाटतं त्याला विश्वासांत घ्यावा—पण या बिकट काळांत हल्लीं कुणापुढं तोंड उघडायची छाती होत नाहीं! अगदीं चाललंय तसं चालूं द्या. माझी कांहीं काळजी करूं नका. जा पाहूं—मी अगदीं सुखांत आहें! ( तो माणूस डोळ्यांत आसवें आणून काकुळतवाणीनें त्याच्याकडे पहातो ) अरे हें चालायचंच! टाकीचे घाव खाल्ल्याशिवाय देवपण मिळत नाहीं. हेही दिवस जातील—पुन्हां केव्हां तरी जगांत—( डोळे पुसून ) पण जाच आतां. येईल कुणी तरी—( पांडू त्या माणसाला लोटून बाहेर घालवतो आणि त्यानें दिलेल्या बारिक चिठ्या उघडून एकेक वाचून फाडून खिडकी बाहेर टाकतो—शेवटची चिट्टी वाचीत असतां सीता येते. त्याला तसा वाचीत असलेला पाहून चोर पावलांनीं त्याच्या मागें येऊन उभी रहाते! तिची चाहूल लागतांच तो दचकतो आणि मागें होतो. ती पुढें येते. )

**सीता**:—एकूण वाचतां येतं तुला?

**पांडू**:—( जरा बावरून ) नाहीं—तसं नाहीं कांहीं! इथं कसला कागद पडला होता—चार दोन अक्षरं आहेत तशीं ओळखीचीं—म्हणून पहात होतों वाचायचा प्रयत्न करून.

**सीता**:—मला सांगतां हें?

**पांडूः**—( दचकून ) सांगतां !

**सीताः**—( निश्चयपूर्वक ) हो, सांगतां ! हीं इथलीं माणसं तुम्हांला ओळखत नसतील पण मी ओळखतें. मलबार हिलवरच्या या लेपर कॉलनींत बहुजनांच्या पुढाऱ्याची ओळख नसली तरी मी काळबादेवीवर रहातें म्हटलं !—आमच्या चाळींतल्या वरच्या मजल्यावरच तुम्हा मंडळीची ये जा होती—(तो तोंडावर बोट ठेवून तिला दटावतो) कांहीं काळजी नको करायला. हेमूला आवडत नाहीं तरीसुद्धां रोज मी येतें इथं, ती तुमच्या काळजी पायीं !—

**पांडूः**—( गहिंवरून ) अशीं माणसं आहेत तुमच्यासारखीं म्हणूनच आमचे हात पाय हालताहेत. कसलं दुर्दैवी जिणं आहे हें ! त्या अडीच वर्षांत आम्हीं सव्वा हात तुरा लावून मिरवलों—नि आतां असं हे डुकरासारखं जमिनींत तोंड खुपसून रहावं लागतंय ! ( आंगठ्याच्या टोकानें डोळ्यांतलीं टीपें पुसून ) फार उपकार आहेत तुमचे बाईसाहेब—

**सीताः**– कुणाला म्हणतां बाईसाहेब ?

**पांडूः**—जगांत बरं दिसेल असंच म्हटलं पाहिजे ना ! भारतमातेच्या भाऊ बहिणी आम्हीं—पण अशीं पारखीं झालों आहोंत एकमेकांपासून—

[ आंतल्या दारांतून रमा बाहेर येते, तिला पहातांच पांडू दचकून दूर होतो. रमा क्षणभर थांबून एकदम सीतेसमोर येऊन उभी रहाते ]

**रमाः**—काय खलबतं करीत होतीस त्याच्याशीं ?

**सीताः**—( उगीचच हंसून ) खलबतं ?—न् याच्याशीं ? या गड्याशीं ? काय बोलतेयस रमूताई ! खलबतंच करायचीं असलीं तर तसं तोलाचं माणूस पाहिलं पाहिजे ना !—

**पांडूः**—माझा मामा आहे यांच्या शेजारच्या घरीं रामा म्हणून ! परवां गेलों होतों काळबादेवीवर तेव्हां कळलं मला ! त्याची खबर विचारीत होतों मी—पण या कसल्या बोलायला आम्हां गरीबांबरोबर ! रामाच्या मामाची खबर काढतो कोण ? जाईन मीच असा एक दिवस रजा घेऊन तुमच्याकडून !

**रमाः**—( सीतेला ) खरं सांगतोय हा हें ?

**सीताः**—तो बिचारा कशाला खोटं बोलेल ! ( पांडू आंत जातो. ) मी कुठं जाऊं याच्या मामाची खबर काढायला ? अशी गड्यामाणसांची खबर काढीत बसलें तर शेजारीपाजारी काय म्हणतील मला ?

रमाः—[ कोचावर बसत ] काय असेल तें असो, या माणसाचा मोठा संशय येतो मला. कसा चोरासारखा वावरत असतो घरांत—तसा कामाला कांहीं वाईट नाहीं—पण दादाच्या खोलींतलीं बुकं धुंडाळतो कशाला कोण जाणे ! त्या दिवशीं विचारलं तेव्हां म्हणाला चित्र पहातोंय बुकांतलीं म्हणून —पण एक सुद्धां चित्र नव्हतं त्या बुकांत ! बाकी तसा अगदीं वाईट नाहीं कांहीं. धांदरट आहे थोडासा—पण माझ्या सेवेला कसा अगदीं तत्पर असतो. हेमूचं न् त्याचं मात्र पटत नाहीं अगदीं. बाकी हेमूचा स्वभावच आहे तसा. तो कांहीं दोष नव्हे पांडूचा !

सीताः—हेमंतरावांचं पटत नाहीं म्हणजे कार्य ?

रमाः—त्यानं कांहीं सांगितलं तर हा ऐकतच नाहीं मुळीं. दादाला कसा जिवापलीकडे जपतो, अण्णांचं तर पांडूशिवाय पाऊल उचलत नाहीं, पण हेमूनं सांगितलं कीं याचं घोडं कां पेंड खातं देव जाणे ! म्हणूनच मला नाहीं आवडत तो !

सीताः—हीं कुळवाडी माणसं मोठीं विलक्षण असतात. एकदां घेतील डोक्यांत तें सोडायचीं नाहींत जीव गेला तरी ! करायचं काय ?—गडी हवा ना आपल्याला, म्हणून सोसलं पाहिजे.

रमाः—सोसतेंच आहें कीं ! शंभरदां येतं मनांत कीं घालवून द्यावा म्हणून —पण असा कांहीं काकुळतीला येतो मी रागावलें म्हणजे !—थांब हं— [ हांक मारते ] पांडू—पांडू—! ( पांडू दाराशीं येऊन उभा रहातो ) इकडे ये ! ( तो पुढें येऊन अदबीनें दूर उभा रहातो ) आतां असं सांग मला, हेमूवर तुझा राग कां ?

पांडूः—राग कसला बाईसाहेब ?

रमाः—केव्हां कांहीं त्यानं सांगितलं तर अगदीं ऐकत नाहींस तूं !—

पांडूः—या घरच्या मालकांना मी ओळखतों, दुसऱ्या कुणाला ओळखत नाहीं ! मला हुकूम करायचा अधिकार या घरच्या माणसांना आहे ! दुसऱ्या कुणाचं मी कां म्हणून ऐकूं ?

रमाः—आतां ऐक सीते ! हें काय सरळ उत्तर झालं ? [ पांडूला ] पण तो कोण आहे तें माहीत आहे ना तुला ?

पांडूः—हो, माहीत आहे ! ओठाची आणि पेल्याची गांठ पडायला मधें फार विघ्नं असतात ताईसाहेब !

रमाः—काय अभद्र बोलतोय पहा. अन् ही इंग्रजी म्हण बरी शिकलास कुठं !

पांडूः—( हलुच हंसून ) ऐकून ऐकून—आपल्या सारख्यांचं ! तुरुंगांत होतों, तिथं मोठीं मोठीं माणसं होती संगातीं, त्यांची सेवाचाकरी करतां करतां खूप खूप ऐकायला मिळालं. कांग्रेशीचीं माणसं होतीं तीं ! कसल्या कसल्या गोष्टी बोलत. आपला ऐकत बसें पुराण ऐकतात तसं ! कानावरून जातां जातां बरंच राह्यलंय ध्यानांत, तेव्हां हे असे शब्द येतात चुकून तोंडांतून ! माफ करा हं ताईसाहेब !—गरीबाचा राग करूं नका—पण एक शब्द विचारूं का ?

रमाः—पाह्यलंस सीते ! जरा सलुख दिली कीं हीं माणसं अशीं आंगलटीला येतात.

पांडूः—आतां हें काय म्हणतां ताईसाहेब ! पायाचा चाकर मी—आंगलटीला यायचा अधिकार मोठ्या माणसांचा—हेमंतरावांसारख्या—

रमाः—( रागानें ) पांड्या !

पांडूः—( तिच्या पायाला हात लावून ) माफ करा हं ! विसरायला होतं असं केव्हां केव्हां ! मोठ्या माणसांच्या घरीं पहिल्यानंच आलोंय मी. अजून इथले रीतरिवाज गळीं उतरायचेयत माझ्या.—पण विचारूं का एक शब्द ?

रमाः—( हंसून ) मोठा गमत्या आहे हा पांडू, नाहीं ग सीते ?—( पांडूला ) बरं बरं, विचार !

पांडूः—खरोखरच का या हेमूचं न् तुमचं—नाहीं चुकलों—हेमंतरावाचं न् तुमचं लगीन व्हायचंय !

रमाः—कां ? तुला कसली एवढी काळजी ?

पांडूः—खरं सांगू—मला ते आवडत नाहींत !

रमाः—आतां ऐक सीते ! याचं का लग्न व्हायचंय हेमूबरोबर ?

पांडूः—तसं नव्हे ! पण मी रमूताई असतों तर हेमूशीं लग्न केलं नसतं.

रमाः—( मोठमोठ्यानं हंसत ) म्हणूनच तूं रमूताई नाहींस !—

सीताः—ऐकलंस, म्हणूनच तूं रमूताई नाहींस ! नाहींतर कशाला आला असतास इथं भांडीं घासायला )

रमाः—कां तुला आवडत नाहींत ते ?

**पांडूः**—कां आवडत नाहींत! आतां कसं सांगूं माझ्या कुळवाड्याच्या भाषेंत! तुम्हीं मोठीं माणसं, मोठीं मोठीं बुकं वाचतां, शिनेमे बघतां, त्यांत काय काय गमती बघतां नि मग तसंच काहींतरी करावं असं तुम्हाला वाटतं! आम्ही सुद्धां शिनेमे बघतों, पण आम्हांला वाटतं, काय हें मुलखावेगळं चाल्लंय! या इथं बघितलं म्हणजे वाटतं कीं तुमचं हें तसंच कांहीं तरी मुलखावेगळं चाललंय! कसला दगडाधोंड्याचा माणूस तो—बिनकाळजाचा कारकून–तुमचीं खेटरं पुसायची तरी लायकी आहे का त्याची?—

**रमाः**—हं हं पांडू—

**सीताः**—ऐकून तरी घे ना तो काय म्हणतो तें—

**रमाः**—आतां तूं देखील जोड देऊं लागलीस का या वेडप्याला?

**पांडूः**—वेडपा तर खराच मी—पण शहाणीं माणसं चुका करूं लागलीं कीं वेडपा होणंच आपलं बरं वाटतं. माफ करा हं!—पायरी सोडून बोललों—पण जीव रहात नाहीं! जरा डोळे उघडून बघा माझ्या डोळ्यांनीं—काळजाच्या माणसाचं बिनकाळजाच्या माणसाशीं कधीं जुगायचं नाहीं—(एक क्षण थांबून) चहा आणूं?

**रमाः**—काय म्हटलंस?

**पांडूः**—नाहीं म्हटलं चहा आणूं का थोडा?

**रमाः**:—नको!—एक ग्लास पाणी आण थंडसं—गारसं—फ्रिजिडेअरमधलं—

[ पांडू सीतेकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहून जातो—क्षणभर स्तब्धता. ]

**सीताः**—मोठीं विलक्षण असतात हीं कुळवाडी माणसं—नाहीं रमूताई?

**रमाः**—(अर्धवट स्वगत) काळजाच्या माणसाचं बिनकाळजाच्या माणसाशीं जुगायचं नाहीं—(सीतेला) असंच ना म्हणाला ग तो?

**सीताः**—हा प्रश्न मला विचारूं नकोस रमा!

**रमाः**—कां?

**सीताः**—कां तें तुझं तुला माहीत आहे! हेमंतराव माझा तिटकारा करतात—नायकिणीची मुलगी म्हणून माझी हेटाळणी करतात—मी इथं येतें तें सुद्धां त्यांच्यानं पहावत नाहीं—त्यांच्याबद्दल मी मत कसं देऊं?

**रमाः**—( विलक्षण नजरेनें सीतेकडे एक क्षणभर पाहून झटकन् मान

वळवून ) खरंच ! तुला हें विचारलं हीच चूक झाली माझी !—( झट्कन् उठून निघून आंत जाते. )

[ ती जात असतांना सीता नुसती पहात रहाते. नंतर खिडकीकडे जाऊन खिडकींतून डोकावून पहाते आणि खालील पद म्हणत इकडे तिकडे फिरते ]

**माला घेई कुणि बाला ।**
**हळु विचारिते । प्रियकर आला सदनाला ? ॥ धृ. ॥**
**गोड गाउनी गाणीं ।**
**नयन जलानें न्हाणी ।**
**पुसे सखीला हां हां—**
**पुसे सखीला विलास कां रुचला तयाला ॥ १ ॥**
**गुंफिलि रानीं फुलें ।**
**त्या प्रणयाच्या बलें ।**
**कळी जिवाची खुले ।**
**परि तो परक्या भुले ॥**
**फसे बिचारी हां हां—**
**फसे बिचारी भुलावणी भलती नराला ॥ २ ॥**

[ एकदां बाहेरच्या दाराबाहेर नजर टाकते आणि नंतर मागें वळते तोंच हातांत ग्लास घेऊन पांडू येतो. ]

**पांडूः**—कुठं गेल्या ताईसाहेब ?

**सीताः**—आंत गेल्या वाटतं ! पाण्याची तहान आतां राहिली नाहीं—पण दिलेला चुरका मात्र चांगला लागला वाटतं !

**पांडूः**—म्हटलं एकदां धीर करून पहावा ! किती भोळी पोर आहे ही !

**सीताः**—भोळी नव्हे—काय बरं ?—मोठी भावनाशील आहे. मुळची वृत्ति निराळी—पण किड्याला नांगी मारणाऱ्या भुंग्यासारखा हा माणूस तिच्या मनांत भलत्या कल्पना रुजवूं पहातोय. किती प्रेमळ आहे ती मुळची ! किती जिवाभावाच्या बहिणी—नव्हे मैत्रिणी होतों आम्ही !—पण या माणसानं आम्हां दोघींत दुरावा आणला ! नायकिणीचीं मुलगी म्हणून ही

माझी हेटाळणी करूं लागली ती त्याच्यामुळं ! पण तिला काय माहीत, कीं एकाद्या दिवशीं—( जीभ चावून, ) जाऊं दे. नकोत त्या गोष्टी ! आतां किती दिवस तुम्हीं असे धुणीं भांडीं करीत रहाणार आहां इथं ?

**पांडू**:—असं विषयांतर करूं नकोस सीते ! खरोखरच प्रसंग मोठा बिकट आहे—माझ्यावर नव्हे—या पोरीवर ! या माणसाबरोबर तिला सुख लागायचं नाहीं. या म्हाताऱ्याला सुद्धां कसं कळत नाहीं हें ?—( एक क्षण थांबून ) दत्ताचं नू तुझं कसं काय जमतं ?

**सीता**:—तसं बरंवाईट असं कांहींच नाहीं. कां ?

**पांडू**:—त्याला एकदां विश्वासांत घेऊन पहा ना ! ( सीता नकारार्थी मान हालवते ) अन् ती तारा ? ती नाहीं का तिला कांहीं सांगायची ?

**सीता**:—एकदां पहातें प्रयत्न करून ! पण ती फारशी बोलतच नाहीं माझ्याबरोबर—म्हणजे ती माझा तिटकारा करते असं नव्हे हं—पण तिचा स्वभावच मोठा एकमार्गी आहे. दत्ता आल्यापासून आतां रमेकडे सुद्धा तिचं दुर्लक्ष व्हायला लागलंय. तीच संधि साधतोय हा हेम्या. अण्णांच्या अर्ध्या इस्टेटीवर डोळा आहे बेट्याचा—अर्धी इस्टेट अण्णांनीं रमेच्या नांवें करून ठेवलीय ना ?

**पांडू**:—अस्सं !—मोठा पेंच आहे तर.

**सीता**:—( हंसून ) तुमच्या जिवाला हा बरा विरंगुळा मिळालाय म्हणायचा —अज्ञातवासांतले बोजे उचलतांना चुरडून गेलेल्या जिवाला ही नसती काळजी म्हणजे मोठी करमणूकच होत असेल नाहीं ?—

**पांडू**:—संसारी माणसांचीं सुखदुःखं नकळत अनुभवतोंय मी ! उगीच वाटतं मनाला, कीं ही आणखी एक जबाबदारी येऊन पडलीय माझ्यावर—

[ दत्ता आणि तारा प्रवेश करतात तें पाहून पांडू दचकतो नि हातांतला ग्लास सीतेच्या हातीं देतो. सीता पाणी पिण्याचें ढोंग करते. दत्ताच्या वृत्तींत आतां बराच फरक पडला आहे. पूर्वीचा घुमेपणा जाऊन थोडीशी खेळकर वृत्ती त्याच्या अंगीं येऊं लागली आहे. ]

**दत्ता**:—तूं आहेस ना इथं पांडू ? ही काठी टोपी नेऊन आंत ठेव अन् माझ्या चपला घेऊन ये. उगीच बूट घालून गेलों हा. या मुंबईत आपल्या वहाणाच बऱ्या.

ताराः—कां ? थायच्यायत वाटतं कुणाला ?
दत्ताः—हो तसाच प्रसंग आला तर !
सीताः—थांब पांडू, हा ग्लास घेऊन जा.
[ पांडू काठी टोपी ग्लास घेऊन जातो. ]
दत्ताः—रमा कुठं गेली ?
सीताः—इथंच होती. आतांच गेलीय आंत.
ताराः—मग जाऊं तर आतां मी ?
दत्ताः—जाण्यासाठीं का तुला घेऊन आलों बरोबर ? बैस तिथं. तूं ग कां उभी सीता—बैस ना !
सीताः—नाहीं मी जातें ! मोडक्या माच्यासारखी मी कशाला या जोडप्यांत ?
[ तिघेही हंसतात ]
दत्ताः—( सीतेला ) बैस तिथं ! जोडप्याच्या गुजगोष्टी काय व्हायच्या होत्या त्या होऊन गेल्यायत आतां ! आतां इथं अगदीं जुन्या कुटुंबासारखीं बसूं या आपण—
ताराः—जुन्या नव्हे नव्या ! जुन्या कुटुंबांत बायका दिवाणखान्यांत बसत नव्हत्या—( सीतेला ) बैस ग ! ( सीता बसतांना जरा संकोचानें बसते ) बैस ना सारखी !
[ पांडू चपला घेऊन येतो आणि दत्ताच्या पायांतील बूट आणि स्टॉकिंग्ज् काढून घेऊं लागतो. त्यावेळीं दत्ता बोलत असतो पण सीतेचें लक्ष पांडूकडे असतें. ती सद्गदित होते. नकळत तिच्या डोळयांतून टिपें गळूं लागतात. ]
दत्ताः—हल्लीं हवा मोठी सुंदर आहे. पूर्वी मुंबईत इतका गारठा नसे—नाहीं तारा ? संध्याकाळच्या वेळीं कलकत्त्याला अशी शिसारी येई, सारा धूरच धूर होऊन जायचा जिकडे तिकडे ! ( सीतेकडे नजर गेल्यामुळें ) काय झालं ग ?
सीता;—( डोळे पुसून ) कांहीं नाहीं—डोळयांत कांहीं गेलं वाटतं ! ( पदरानें डोळे पुसते )
पांडूः—( बूट स्टॉकिंग्ज् हातांत घेऊन जात असतां ) चहा आणूं का ?
ताराः—आतां नको चहा—( दत्ताला ) नको ना ?
दत्ताः—जशी आपली मर्जी !

**तारा**:—म्हणजे हवायू वाटतं ? आत्तांच घेतला ना चहा त्या इराण्याच्या दुकानांत ? कांहीं नको चहा, जा रे पांडू. ( पांडू जातो ) ही अण्णांची खोड उतरलीय आणखी. असा वारंवार चहा घेणं बरं नव्हे !

**सीता**:—( हंसून ) सत्तागाजवणी सुरू झाली वाटतं !

**दत्ता**:—कुणी तरी हवंच होतं माझ्यावर सत्ता गाजवायला. अमूक एक कांहीं करूं नको म्हणणारं कुणीच लाभलं नव्हतं मला जन्मापासून. अण्णांनीं चोचले चालवलेले, रमू तर उलटी मलाच भीते, आतां ही भेटल्यापासून कुणीतरी वडील माणूस लाभल्यासारखं वाटतंय मला.

**सीता**:—ही ? ( हंसून ) एवढीशी ही ?

**दत्ता**:—एवढीशी ? लवंगी मिरची किती बारीक असते पाहलीयस ? पण कशी असते जलाल !

**तारा**:—लवंगी मिरची का मी ?

**दत्ता**:—नाहींस ? किती चटके देत असतेस मला पदोपदीं ! अण्णांनी म्हटलं पण पटलं नाहीं, तूं हुकूम केलास म्हणून ना मी आतां कारखाना उघडला ?

**तारा**:—पण आतां चाललाय ना तो जोरांत ? हेमूच्या नोकरीपेक्षां ही स्वतंत्र धंद्याची राबणूक गोड नाहीं का वाटत ?

**दत्ता**:—हेमू आला नाहीं वाटतं आज ? तेव्हांच रमा आंत बसलीय–वाट बघत बसलीयू वाटतं त्याची !

**सीता**:—( अवसान घेऊन ) तुला कसं वाटतं दादा याबद्दल ?

**दत्ता**:—कशाबद्दल ?

**सीता**:—हेमूरमूबद्दल ?

**दत्ता**:—अण्णांनीं ठरवून टाकलंय ना तें ?

**सीता**:—रागावूं नकोस दादा—खरं सांग—अगदीं मनापासून सांग—तुला सारं कांहीं माहीत आहे—तूं, मी आणि अण्णा या तिघांखेरीज कुणालाच माहीत नाहीं तें—

**तारा**:—काय तें ?

**सीता**:—( तारेला ) थांब—( दत्ताला ) अगदीं खरं सांग दादा तें तसं असतांना हेमूच्या घरीं सुख लागेल का रमूला ? किती झांकून ठेवली तरी

आज ना उद्यां ती गोष्ट बाहेर फुटेल—अन् मग मातेरं होईल या रमूच्या आयुष्याचं. तुला नाहीं असं वाटत ?

**दत्ता:**—पहिल्यापासूनच चुकलंय अण्णाचं. तीही चूक झालीय, हीही चूक झालीय ! बापाच्या ऐवजीं आई होऊन बसलेयत अण्णा, म्हणून ही अशी भयंकर चूक करून बसलेयत !—कशी या पेचांतून सुटका होणार आहे रमेची ?

**तारा:**—कसला पेंच ?

**दत्ता:**—माफ़ कर तारा, तें दुसऱ्याचं गुपित आहे. तुला सुद्धां सांगतां येत नाहीं तें ! किती जणांच्या जिवाचे धागे गुंतून पडलेयत त्या गुपितांत ! —केवढी चूक केलीय ही अण्णांनीं !

**सीता:**—आतां उपाय ?

**दत्ता:**—रोज तेंच जाणवत असतं मला. सारखा तोच विचार करीत असतों मी—कसं हें कोडं सुटणार !

**पांडू:**—( प्रवेश करून ) चहा नको असला तर सोडा आणूं का ?—कीं लेमन ?—( तारेला ) तुम्हांला ऑरेंजज्यूस हवा असेल ? ( सीतेला ) अन् तुम्हांला काय हवंय्—थंड पाणी ?

**तारा:**—भलत्यावेळीं भलतंच विचारायची तुझी ही भारी वाईट खोड पांडू !

**पांडू:**—( बावरल्यासारखें करून ) काय चुकलं ?—काय झालं ? तुमच्या खायप्यायची काळजी मी करायची नाहीं तर इथं ठेवलाय कशाला मला ? नुसतीं धुणीं भांडीं केर काढायला ? तुम्हीं हें असं म्हणतां, पण तो कारकुनडा आला म्हणजे कसे हुकूम सोडतो एकामागून एक—

**सीता:**—असं म्हणूं नये पांडू !

**पांडू:**—कां म्हणूं नये ? मी कांहीं त्याचा लाजिमदार नाहीं ! मोठा माणूस असला तर तो आपल्या घरचा. इथं येऊन माझ्या घरीं मला हुकूम करतो !

**दत्ता:**—तुझ्याघरीं ? ( हंसतो )

**पांडू:**—( चिडून ) माझ्या घरीं नव्हे तर काय ? तिजोरीच्या किल्ल्या अण्णांकडे नाहींत न् तुमच्याकडेही नाहींत—( शॉर्टच्या खिशांतल्या किल्ल्या काढून वाजवीत ) मी आहें इथला मास्टर ऑफ एक्सूचेकर—( जीभ चावतो )

दत्ताः—अरे वा! बरे हे असले शब्द आठवतात तुला ?

पांडूः—( ओशाळून ) तुरूंगांत असतांना ऐकत होतों ना ? एकेक शब्द राहिलाय असा ध्यानांत !—मग काय आणूं ? सोडा ? लेमन ? ऑरेंज ज्यूस ?—

दत्ताः—कांहीं नको आम्हांला ! बैस तिथं ! तुझ्या कुळवाड्याच्या अकलेची परीक्षा घ्यायचीय मला ! ( पांडू दूर कोंपऱ्याला उकिडवा बसतो ) मालक आहेस ना तूं या घरचा ?

पांडूः—तर !

दत्ताः—तर मग आतां असं सांग—

ताराः—काय विचारणार आहेस त्याला ?

दत्ताः—ऐक ना—असं सांग पांडू, हेमंतरावांबरोबर रमेचं लग्न झालं तर काय वाटेल तुला ?

पांडूः—( निर्विकारपणें ) घराला आग लागल्यासारखं वाटेल.

दत्ताः—( तारेला ) ऐक आतां !

सीताः—( पांडूला ) असं कांहीं अभद्र बोलूं नये पांडू !

पांडूः—अभद्रच करायला उठलांत तुम्हीं सारीजणं, तर माझ्या कुळवाड्याच्या तोंडांतून कां येऊं नये अभद्रवाणी ? मनांत एक असायचं, बाहेर दुसरं दाखवायचं, तें तुम्हां पांढरपेशांना चांगलं जुगतं ! आमचा कुळवाड्याचा बाणा नव्हे तो ! आमचे आपले एक घाव दोन तुकडे ! वाटलं तर ऐका, नाहींतर सोडून द्या—( उठून ) काय आणूं ? सोडा, लेमन कीं ऑरेंज ज्यूस ?

दत्ताः—कांहीं नको आणूंस. बैस तिथं ! ( पांडू बसतो ) आज या विषयाचा निकाल लावायचा आपल्याला—

पांडूः—निकाल कसला लावायचा ! मी एकदां बोलून टाकणार आहे थोरल्या धैंनीसाहेबांपाशीं ! रागावतील—फारतर काढून टाकतील नोकरीवरून. माझं काय कुळवाड्याचं—या बिळा मारला खिळा चल जाऊं दुसऱ्या बिळा !—उंदरासारखंच जिणं आहे आमचं ! उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाहीं म्हणावं ! समोर समोर दिसतंय तुम्हां लोकांना पण बोलायची छाती नाहीं एकाला सुद्धां ! एकदां लगीन लागून गेलं कीं मग डोकं फोडलंत

दगडावर आपटून तरीसुद्धां कांहीं व्हायचं नाहीं ! तुम्ही पांढरपेशे हे असलेच ! उगीच मरत असतां मोठेपणापायीं ! आग लावा कीं असल्या त्या मोठेपणाला ! ( धुसपुसत उठून उभा रहातो. )

ताराः—फारच पिसाळलाय बरं का पांडू आज ! बैस बैस पांडू. असा रागावूं नकोस ! आपण उपाय काढूं यांतून कांहींतरी !

सीताः—उपाय कसला काढायचा ? तुम्हांला वाटतं तितकं तें काम सोपं नाहीं ! इतके दिवस कानीं कपाळीं ओरडून अण्णांनीं ठसवून दिलंय तिच्या मनांत कीं हाच तुझा नवरा ! तेंच घेऊन बसलीय ती ! बघतच नाहीं डोळे उघडून ! पुन्हां पुन्हां माझ्या मनांत येतं—बरं का दादा—पुन्हां पुन्हां माझ्या मनांत येतं—

दत्ताः—नाहीं सीता, नाहीं. अण्णांना मी वचन दिलंय !—नव्हे अण्णांनीं मला विनवलंय—डोळयांत पाणी आणून विनवलंय—तें व्हायचं नाहीं ! धक्का बसेल तिला ! तुला कल्पना नाहीं सीता—

सीताः—चांगली कल्पना आहे मला. पण ती कल्पना आहे म्हणून का तिला खड्डयांत उडी घेऊं द्यायची ?

ताराः—असली कसली भयंकर गोष्ट आहे ही ? मला नाहीं का सांगतां यायची ?

दत्ताः—( एक सुस्कारा टाकून ) काय करूं ? केव्हां तरी तुला कळणार—पण आज सांगतां येत नाहीं. नाइलाज आहे माझा ! असं वाईट वाटून घेऊं नकोस तारा. दुसऱ्याचं जोखीम आहे तें. आणि तसाच अगदीं गळ्याला फांस लागल्याखेरीज या बाबतींत मला तोंड उघडतां यायचं नाहीं !

सीताः—मी सांगेन ! मला कांहीं कुणी शपथ घातली नाहीं, कीं माझ्या-समोर कुणी रडलंही नाहीं—

दत्ता—नाहीं सीता, अण्णांच्या मनाकडे थोडी नजर दे ! रमेला केवढा धक्का बसेल ! नुसत्या कल्पनेनंसुद्धां माझ्या अंगावर शहारे येतात. या एकाच गोष्टीपायीं मी अण्णाशीं भांडण करून निघून गेलों होतों ! माझी आई तेव्हां हयात नव्हती. रमेची आई तर ती दोन वर्षांची असतांनाच मरून गेली होती. माझ्या आईनं रमेला वाढवली. माझ्यापेक्षांसुद्धां तिचं प्रेम होतं रमेवर. पहातेस काय तारा !—दोघीही माझ्या आईच—हो !—

दोघीही आईच ! पण रमेच्या आईचा मी निष्कारण द्वेष करीत होतों. आतां पश्चात्ताप होतोय मला—पण तेव्हां कुढत होतों मनांतून. खरोखरच ती एक माऊली होती. अगदीं रमेसारखाच भोळा स्वभाव होता तिचा. पण ही सावत्रपणाची जाणीव मोठी वाईट अन् तो सावत्रपणाही मोठा विलक्षण होता—( एक सुस्कारा टाकून ) जाऊं दे—नकोत त्या गोष्टी आतां ! तो पांडू बसलाय तिथं, आधींच त्याचा पांढरपेशांवर आहे राग—

पांडूः—आहेच मुळीं ! तुम्हीं पांढरपेशे म्हणजे मोठे दांभिक—मोठे लुच्चे—मोठे लबाड—स्वतःच्या जिवाशीं लबाडी करतां तुम्हीं लोक. त्यापेक्षां आम्हीं कुणबटंच बरीं. जिवाची मैत्रीण म्हणवतां पण तिच्यासमोर तोंड उघडायची छाती होत नाहीं तुमची. नि ही नायकिणीची मुलगी ! हीही तसलीच ! पांढरपेशांचीच अवलाद कीं नाहीं !

ताराः—हं हं पांडू ! जीभ आवर, जीभ आवर !

सीताः—नाहीं. बोलूं दे त्याला ! एक शब्द सुद्धां खोटा नाहीं त्याच्या तोंडचा. कुणीतरी ऐकवलंच पाहिजे होतं हें तुम्हां लोकांना—

[ बाहेर घंटा वाजते. ]

पांडूः—आला वाटतं तो लफंग्या !

दत्ताः—चल तारा, चल सीता, आपण आंत जाऊं ! रमा येईल आतां धांवत ! चला या लौकर—माझ्या खोलींत चला—या—या बाजूनं !

[ दत्ता, सीता, तारा जातात. पांडू बाहेरच्या दारावर जातो. आंतून गात गात रमा बाहेर येते. ]

रमाः—[ दारा बाहेर येत असतांना ] हेमूच !—( गाऊं लागते )

[ हेमंत आंत येतो. त्याच्या मागोमाग पांडू येतो. खालील पद म्हणत म्हणत हेमंताचे दोन्हीं हात धरून रमा त्याला आणून कोचावर बसवते आणि तुटीच गात रहाते. ]

सखि रुसली ग ।
आलि तोऱ्यांत ग ।
जोरांत अवखळ राग ॥
जिवाचा फुलला फुलबाग ।

प्रेमाचा खुलला मधुराग।
झुलेल कुणाशीं मग सांग ॥
जरि तो परका, जिवजान सखा।
हृदयीं वाचाळ, मुखांत मुका।
श्रवणांत अथांग अबोल वचें।
बिनमोल, बळें शिरला निरखा।
प्रेमाचा डुलेल नव नाग ॥

**हेमंतः**—किती सुंदर गातेस तूं रमा.

**रमाः**—खरंच ? कीं उगीच आपली तोंडदेखली स्तुति करायची माझी ?

**हेमंतः**—तूं गाऊं लागलीस कीं असं वाटतं—( थांबतो )

**रमाः**—कसं वाटतं ?

**हेमंतः**—कीं तुझं गाणं ऐकत ऐकत झोंपीं जावं !

**पांडूः**—हें गाणं ऐकत ऐकत मरून जावं असं मला वाटतं !

**हेमंतः**—गप्प बैस गाढवा !

**पांडूः**—हें पहा साहेब, माणसाला नांवं ठेवतांना सुद्धां जरा जपून नांव ठेवावं. गाढवाची जात मोठी गरीब—मोठी कष्टाळू—धूळ फुंकून पोट भरीत धन्याची नोकरी करतं गाढव—पण चिडलेलं गाढव दुगाण्या झाडतं साहेब. माहीत आहे ना ? पुढल्या खेपेला दुसरी कांहींतरी शिवी द्या.

**हेमंतः**—काय फाजिल माणूस आहे हा ?

**रमाः**—पांडू, आतां जरा आंत जाशील ?

**पांडूः**—हुकमाचीच वाट बघत होतों मी ! काय आणूं ? सोडा, लेमन कीं ऑरेंजज्यूस ? कीं नुसताच चहा आणूं गरम गरम ?

**हेमंतः**—( रागानें ) कांहीं नको आणूं !

**पांडूः**—( अदबीनें ) मी तुम्हांला नव्हतं विचारलं साहेब ! ( रमेला ) काय आणूं ?

**रमाः**—मग सांगेन, आतां जा ! ( पांडू जातो ) अडला नारायण गाढवाचे पाय धरी. हे दिवस आलेयत ना असले, म्हणून सारं सहन करावं लागतं. नाहींतर हा अस्सा घालवून दिला असता याला, इतका राग आलाय मला या पांडूचा, उगीच ज्यांत त्यांत तोंड घालीत असतो !

**हेमंतः**—जाऊं दे. मी आज कां आलोंय माहीत आहे ? बाबानीं न् आईनं तुला घेऊन यायला सांगितलंय आतां !

**रमाः**—आतां ?—यावेळीं ! कशाला ?

**हेमंतः**—तें घरीं आलीस आमच्या म्हणजे कळेल तुला ! तशीच एक मोठी गंमत व्हायचीचय आज—! चल, जरा कपडे बदलून ये.

**रमाः**—थोडीशी कल्पना द्यायची मला—अगदीं थोडी—अगदी इवली इवलीशीच !

**हेमंतः**—अं हं : ! तें व्हायचं नाहीं. तें तिथंच कळलं पाहिजे आमच्या घरीं. असा पोषाख करशील, अगदीं अगदीं सुंदर दिसली पाहिजेस !

**रमाः**—कुणाला ?

**हेमूः**—आधीं मला !—अन् मग बाकीच्यांना–आमच्या घरच्या माणसांना.

**रमाः**—म्हणजे आत्तां मी कुरूप दिसतेंय वाटतं ?

**हेमंतः**—असं कुठं म्हटलं मी ?

**रमाः**—अन् चांगले कपडे केले कीं मग मी सुंदर दिसणार आहें वाटतं ? मग ते कपडेच घेऊन जा कीं आपल्याबरोबर !

**हेमंतः**—लुच्ची लबाड कुठली ! जा आतां. पुरे झालं. ते डूल घालायला विसरूं नकोस बरं का कानांतले ! असे झगझग चमकले पाहिजेत तुझ्या दातांशेजारीं हंसतांना !

**रमाः**—चला ! ( जाऊं लागते )

**हेमंतः**—आणि असं पहा, अण्णासाहेबांना जरा पाठवून दे इकडे ! आहेत नां ते घरांत ?

**रमाः**—( मागें वळून पाहून ) तर जाणार आहेत कुणीकडे ?—आलें हं ! ( दुडदुडत जाते. जात असतांना दाराशी थांबून नाकाजवळ बोट धरून ) मला कळलंय बरं का सारं कांहीं—आत्तां कळलं—देतें हं पाठवून अण्णांना !( जाते )

[हेमंत आपल्याशींच नाजूक नाजूक हंसत इकडे तिकडे फिरतो. आंतल्या आणि बाहेरच्या दारांत डोकावून पहातो. अण्णासाहेब येतात.]

**अण्णा०ः**—मला बोलावलंस हेमू ? ( कोचावर बसतात ) बैस ना. काय आहे ?

हेमंतः—आज रमूला बरोबर घेऊन मी घरीं जाणार आहें.

अण्णा०:—( जरा आश्चर्यानें ) असं ? आजच काय आहे ?

हेमंतः—तसंच कांहीं आहे ! फार दिवस झाले, आई म्हणाली, रमूला पाहिलं नाहीं तिनं अलिकडे ! ( लाजत ) एकदां पुन्हां पाहीन म्हणाली. आणखी तें असं आहे—( थांबतो )

अण्णा०:—सांग ना काय तें. माझ्याकडे कांहीं संकोच धरायला नको तुला—

हेमंतः—पण वडील माणसांच्या समोर—

अण्णा०:—कधीं वागलोंय का मीं वडील माणसासारखा ?

हेमंतः—तें खरं आहे—पण बाबा म्हणाले—असं म्हणाले बाबा—आतां तिथिनिश्चय करायचा आहे—( क्षणभर थांबतो ) त्यापूर्वी एकदां सारं कांहीं कळलं त्यांना—

अण्णा०:—मग मी येऊं का तुमच्याबरोबर ?

हेमंतः—नको नको ! हिला एकटीलाच घेऊन यायला सांगितलंय आईनं. पण बाबा म्हणाले, कुळाचार आहे, शिष्टाचार आहे, घरंदाज माणसं आम्हीं, तुमचंही घराणं मोठं आहे, तेव्हां जें कांहीं व्हायचं तें दोन्हीं घराण्यांना शोभेसं झालं पाहिजे !

अण्णा०:—तुझ्या बापाला म्हणावं, त्याची काळजी नको. त्याच्या ध्यानीं मनीं सुद्धां नसेल एवढ्या थाटानं होऊन जाईल सारं कांहीं. माझी अर्धी इस्टेट मी आधींच रमूच्या नांवें करून ठेवलीय ! शिवाय जीं कांहीं करणी—कौतुकं व्हायचीं तीं अगदीं यथास्थित होतील म्हणावं—

हेमंतः—तसं नव्हे ! तसं विचारायचा नव्हता माझा उद्देश. पण बाबा म्हणत होते, कीं आपला आशीर्वाद असला म्हणजे सारं कांहीं झालं !

अण्णा०:—बरं बरं उद्यां भेटेन मी तुझ्या बापाला !

( त्या पूर्वीच्या पदांतील खालील चरण म्हणत रमा आंत गात असलेली ऐकूं येते )

जरि तो परका, जिवजान सखा ।
हृदयीं वाचाळ, मुखांत मुका ।
श्रवणांत अथांग अबोल वचें ।

बिनमोल, बळें शिरला निरखा ।
प्रेमाचा डुलेल नव नाग ॥

**हेमंतः**—मोठी खुषींत आहे ती आज !

**अण्णा०ः**—असायचीच—सांगितलंस वाटतं तिला ?

**हेमंतः**—नाहीं. तसं स्पष्ट कांहीं सांगितलं नाहीं—पण तिला आलीय ती कल्पना ! आज आशीर्वाद देणार आहेत आई न् बाबा आम्हांला—आम्हां दोघांना. मी सांगितलं नाहीं तिला तसं, तरीपण—( उगीच थोडेंसें हंसतो )

**अण्णा०ः**—कळायचंच ! कळायचंच ! मनोमन साक्ष आहे ना ? तुझ्या बाबांना म्हणावं, शक्य तितक्या लौकरचा मुहूर्त धरा—अगदीं पहिलाच मुहूर्त धरा म्हणावं. मी अगदीं घाईला आलोंय म्हणावं. माझे डोळे उघडे आहेत तोंवर एकदां तुमच्या डोक्यावर अक्षता पडलेल्या पाहिल्या कीं माझा जीव खालीं पडेल. आतां दत्ताही आलाय—तेंही शल्य राहिलं नाहीं—तो आला नव्हता,—येत नव्हता म्हणून हे इतके दिवस जाऊं दिले मी ! आतां जितक्या लवकर हें कार्य उरकून जाईल तितका माझा जीव खालीं पडेल—( रमा येते ) आलीस ? दीर्घायु हो पोरी—सौभाग्यवती हो !

**रमाः**—नमस्कार करायच्या आधींच आशीर्वाद देतां होय !

**अण्णा०ः**—काय सुंदर दिसतेय माझी रमा !—नाहीं हेमू ?—( दोघांकडे पाहून ) अगदीं लक्ष्मीनारायणाचा जोडा दिसतोय् !

**रमाः**—( हेमंताला ) आतां नमस्कार करायचा ना अण्णांना !

**अण्णा०ः**—नाहीं बरं ! वरपक्षाचा अग्रमान आहे. आधीं तिकडे नमस्कार करून ये.

**रमाः**—( अण्णासाहेबांचे दोन्ही हात धरून त्यांना वर उठवून ) आतां चला तुम्हीं घरांत !

**अण्णा०ः**—हें आधींच कळायला पाहिजे होतं मला.

[ तो जाऊं लागतो. जातांना वळून पुन्हां पुन्हां त्या दोघांकडे मागें वळून पहात असतांना दाराजवळ त्याला ठेंच लागते. तो जातो. त्यावेळीं रमा दाराकडे पाठ करून हेमंतच्यासमोर उभी रहाते. ]

रमाः—जमलंय कीं नाहीं ?

हेमंतः—( आर्टिस्टप्रमाणें हात धरून पहात ) छान्! सुंदर! अरे पण हें काय—

रमाः—( आपल्या कपड्याकडे पहात ) काय चुकलं ?

हेमंतः—पायांत चपला!

रमाः—मग काय हवंय ?

हेमंतः—बूट !—शामॉय लेदरचे उंच टांचेचे बूट—

रमाः—( गडबडीनें हांक मारते ) पांडू—पांडू !—( पांडू येतो ) माझे उंच टांचेचे बूट—

पांडूः—काळे, पांढरे कीं तपकीरी ?

रमाः—( हेमंतकडे पहात ) कुठले ?

पांडूः—पांढरेच आणतों—( असें म्हणून जातो )

रमाः—( हेमंतकडे पहात ) पांढरेच बरे नाहीं ?

हेमंतः—पाहूं घातल्यावर !

( पांडू बूट घेऊन येतो आणि तिच्यापुढें ठेवतो. ती दोन्ही चपला दोन बाजूला उडवून देऊन खुर्चीवर बसते आणि बूट घालूं लागते. )

पांडूः—( खालीं बसत ) मग गडी कशाला ठेवलास मला ? ( पांडू तिच्या पायांत बूट चढवूं लागतो ) किती गोंडस आहेत हे पाय ! कितीं नाजूक !

हेमंतः—काय म्हटलंस ?

पांडूः—म्हटलं—किती नाजूक आहेत हे बूट ? ताड्कन् मारले तरी लागायचे नाहींत. ( तो बुटाचे बंद बांधीत असतांना तिच्या पायावरून हात फिरवतो )

हेमंतः—चल आटप लौकर. काय रेंगाळत बसलायस ?

पांडूः—छान ! सुंदर ! ( असें म्हणून मागल्या पावलीं मागें हटून तिच्याकडे पहात रहातो )

हेमंतः—( त्याला लोटून ) चल हट्—( रमेला ) आतां चलावं म्हटलं राणीसाहेब. खालीं मोटार खोळंबली आहे आपल्यासाठीं.

( हातांत हात घालून गुणगुणत दोघें बाहेर जातात )

पांडूः—गरीब बिचारी खुळी पोर !

[ दत्ता, तारा, सीता, प्रवेश करतात—क्षणभर तिघेंही दाराजवळ जाऊन बाहेर पहात रहातात आणि नंतर परत येतात ]

**तारा:**—जातेय मोठ्या आनंदानं—येईलही मोठ्या आनंदानं—पण पुढं काय ?

**दत्ता:**—खरंच ! पुढं काय ?

**सीता:**—पुढं काय ! पुढं जातां कामा नये ! ( गहिंवरून ) पुढं जाऊं देऊं नका तिला ! ( दत्ताच्या पायाजवळ खालीं पडून त्याचे पाय धरून ) तिला पुढं जाऊं देऊं नकोस दादा. तुझ्या पाया पडतें, पदर पसरतें, एवढी मला भीक घाल ! तूं तोंड उघडलं नाहींस तर जन्माचा नाश होईल बिचारीच्या !

[ दत्ता दगडासारखा सुन्न होऊन उभा रहातो. पांडु त्याच्याकडे रोखून पहात असतो. ]

**तारा:**—मोठा बिकट पेंच आलाय हा. आतां सारं कळलं तेव्हां मला पटूं लागलं. नाहीं—नाहीं—नाहीं ! हें लग्न होतां कामा नये ! ( एकदम खालीं बसते. )

**दत्ता:**—ऊठ तारा,—ऊठ सीता, डोळे पूस. जगाची रहाटी ही अशी आहे. परिस्थितीचे गुलाम आहोंत आपण. ही गुलामीची बेडी तोडणं आपल्या हातीं नाहीं. कुणी सांगावं—कदाचित् सारं कांहीं सुरळीत दिखील होईल.

**तारा:**—नाहीं—नाहीं—नाहीं ! गवताखालची ही ठिणगी झांकली तरी झांकून रहायची नाहीं. ती केव्हांतरी पेट घेणार—साऱ्यांना भाजून टाकणार—डोंब होऊन जाणार साऱ्या संसाराचा !

**दत्ता:**—( तारेच्या मस्तकावरून हात फिरवीत ) शांत हो—शांत हो ! अजूनही अवधि आहे—

**पांडु:**—( खवळून ) अवधि आहे म्हणे ! लग्नाची माळ पडायची वेळ आली तरी म्हणे अवधि आहे. माझी कुळवाड्याची अक्कल घ्या. तुमचं काय गुपित आहे तें मला माहीत नाहीं नि मला कळायलाही नको तें ! गुपित असो कीं गुपित नसो–होतंय् हें कांहीं चांगलं नाहीं. सत्यानाश होईल त्या गरीब पोरीच्या जन्माचा ! काय वाटेल तें करा पण हें लग्न होऊं देऊं नका. अधम आहे तो कारकूनडा ! मिळकतीचा अंदाज काढीत होता

अण्णासाहेबांकडून! अर्धी इस्टेट पदरांत पडेल अशी खात्री झाली तेव्हां घेऊन गेला तिला. दारा आड राहून मी ऐकत होतों—

**तारा**:—ज्याची त्याची पैशावर नजर. पण तें कळलं तरी देखील ही पैशावरची नजर राहील का तशीच टिकून? कारकूनाच्या जातीला पैसा हवा असतो, पण तो सुखासमाधानानं मिळाला तर! तिथं खर्ची पडायला तयार नसतो तो! इथं खर्ची पडावं लागणार आहे तें माहीत नाहीं त्या बिचाऱ्याला!

**सीता**:—( गंभीरपणें ) मी सांगून ठेवतें तुला दादा, मला हें सहन व्हायचं नाहीं. शेवटच्या घटकेपर्यंत मी वाट पाहीन नि तुम्हीं सारींजणं जर अशींच तोंड दाबून स्वस्थ बसलां तर शेवटच्या घटकेला मी तोंड उघडीन.

**दत्ता**:—( खालीं बसत ) आतां येईल ती इतक्यांत. तिला कांहीं कळतां कामा नये. आपण अगदीं आनंदांत आहोंत असं दिसलं पाहिजे तिला ती येईल तेव्हां.

**पांडू**:—मग हंसा ना सारींजणं—दांत विचकून हंसा की!

**दत्ता**:—त्याहीपेक्षां दुसरा उपाय आहे एक चांगला! तें तुझं गाणं म्हण ना तारा—!

**तारा**:—कुठलं?

**दत्ता**:—'बोहल्यावर चढतांना'!—

**तारा**:—हंसायच्या ऐवजीं रडायलाच येईल तें म्हटलं तर!

**पांडू**:—मग रडा तर सारींजणं! ( एकदम जातो )

( तारा खालील पद हळुहळु म्हणूं लागते )

**चल बाइ पुढें जा।**
**अभिमान भरें या पथें जा॥ धृ.॥**
**कुणासवें कोण जडे जीवन मार्गें।**
**तोड जुने पाश हे जा वेगें।**
**बाल्य तुझें जाळिलें होम न लाजा॥ १॥**
**जित्या जिवा हवन सुखें स्थंडिलिं या दे॥**
**होम जळे हाय! हा ये भडकुं दे।**
**गेह तुझें विसर गे बंदित या जा॥**

[ पदाच्या शेवटीं अगदीं गहिंवरून येते. तिघांचेही डोळे भरून आलेले असतात. तोंच रमा धांवत उड्या मारीत येते आणि एकदम येऊन तारेच्या गळ्याला मिठी मारते. हेमंत दारांत उभा असतो ]

**रमाः**—झालं—ठरलं !

**ताराः**—काय ?

**रमाः**—आशीर्वाद दिला मला त्यांनीं !

**ताराः**—कुणीं ?

**रमाः**—हेमूच्या आईबापांनीं ! केवढा आनंद झालाय मला !

**दत्ताः**—( पुटपुटत ) केवढा आनंद झालाय !

**रमाः**—( एकदम उठून ) पांडू ! पांडू ! ( पांडू येतो ) बाईनां म्हणावं आज हेमू इथं जेवायला आहे ! थांब पांडू—माझं लग्न ठरलं !—कळलं ? माझं लग्न ठरलं !—पंधराच दिवसांनी मी माझ्या सासरीं जाणार !—

**पांडूः**—अन् मग माझं काय ?

**रमाः**—अण्णा आहेत, दादा आहे, ताराही येईल आतां इथंच—

**पांडूः**—राम राम ! मी चाललों, तुम्हींच सांगा बाईंना ! ( बाहेर जाऊं लागतो )

**दत्ताः**—( पुढें येऊन त्याच्या पाठीवर हात ठेवून ) तूं वेडा आहेस पांडू ! जा आंत. मी आहें इथं—कळलं ? मी आहें !

**पांडूः**—( त्याचा हात आपल्या हातांत धरून ) वचन ? ( दत्ता सुन्न झाल्यासारखा स्तब्ध रहातो )

**पांडूः**—( पुटपुटत ) भित्रट ! भेकड !

**सीताः**—( पुढें येऊन पांडूला ) मी देतें वचन !

**रमाः**—( आश्चर्यानें ) कसलं वचन ?

**पांडूः**—माझ्या डोंबलाचं ! ( दाराकडे पाहून ) आतां ये रे कारकून्ड्या जेवायला !

[ पडदा ]

# अंक तिसरा

[ स्थळ पहिल्याप्रमाणेंच-खिडकींत उभी राहून तारा गात आहे. तिच्या हतांत छत्री आहे त्यावरून ती कुठें तरी बाहेर जाण्याच्या तयारींत असावी. दाराशीं उभा राहून पांडू तिचें गाणें ऐकत आहे. तारा खालील पद म्हणत आहे. ]

***खुण माझ्या हृदयांतरिंची, खुणविली कुणा जीवानें। मोलाचे बोल जिवाचे पुसटले कुण्या भावानें ॥ दुणविलें प्रेम नवलाचें, म्हणविलें नव्या नावानें ॥ हा कोण कुठोनी आला। न कळतां चढे कळसाला। पावला देव नवसाला। उणि खूण पटे। गुण दोष तुटे। विकसलें कुसुम हृदयाचें, दरवळे जिवाभावानें ॥ १ ॥**

[ पद संपत असतांना आंतून बाहेर जाण्याचा पोषाख करून दत्ता बाहेर येतो. तो येत असतांना आंतल्या दाराशीं असलेला पांडू सरकून बाजूला होतो ]

**दत्ताः**—( पांडूला ) तूं आहेसच वाटतं इथं ऐकत ?

**पांडूः**—( हंसून ) मोठा गोड गळा आहे ताराबाईचा—पण रमूताईची सर नाहीं ! तिचं गाणं काय तें न्यारंच ! बागडत असते नुसती आवाजाशीं !

**ताराः**—( पुढें येऊन ) अन् मी रे ?

**पांडूः**—तुमचा आवाजच बागडत असतो तुमच्याबरोबर !—बाहेर चाललांत वाटतं ?

---

* वरील पदाऐवजीं हें पद म्हटलें तरी चालेलः—

**किति भाव नवा नवलाचा। नकळे मनिं ये साचा ॥ ध्रु. ॥ उदास कां रे बसला माझा राणा। मनिं राग काय रे आला। अनुराग तुझा कसा रे। हृदयाचा। मोलाचा ॥ १ ॥ विचार बोलें अपुल्या जीवा माझ्या। मज लाज वाटते बोला। किति आवडता सखा तूं। हृदयाचा। मोलाचा ॥ २ ॥**

**तारा**ः—असं विचारूं नये जातांना !

**पांडू**ः—पण ' कुठं जातां ' म्हणून मी कुठं विचारलं !

**तारा**ः—तें खरं !—पण असं विचारूं नये.

**पांडू**ः—न विचारून कसं भागेल ! मालकांनीं विचारलं तर त्यांना काय उत्तर द्यायचं ? रमूताई गेलीय बाहेर ती अजून आली नाहीं. तीनदां विचारलं मालकांनीं —पण मला सांगितलंच नाहीं तर मी तरी उत्तर काय देऊं ? म्हणून विचारतोंय !

**दत्ता**ः—विचारलंच तर सांग, म्हणावं गेलींयत कुठंतरी दोघं हिंडायला ! चल तारा—( तीं दोघें जाऊं लागतात. )

**पांडू**ः—जरा थांबा दादासाहेब !

**दत्ता**ः—काय आहे ?

**पांडू**ः—आतां चारच दिवस राहिले लग्नाला. काय करणार तुम्ही ?

**दत्ता**ः—तोच विचार करतोंय मी ! अगदीं कावून गेलोंय् ! इथं कांहीं बोलतां येत नाहीं म्हणूनच आम्हीं बाहेर जातों आहों.

**पांडू**ः—आतां वेळ घालवून उपयोग नाहीं. कांहीं तरी केलं पाहिजे.

**दत्ता**ः—आजच कांहीं तरी करणार असं ठरवलंय मी ! एकदां सीता भेटली पाहिजे होती. तिनं तर आतांशा यायचंच टाकलं इकडे—

**तारा**ः—मोठी घुमी आहे ती ! कांहीं अंत लागूं देत नाहीं कुणाला ! परवां मला भेटली होती रस्त्यांत—मला तोंड चुकवून जात होती—मी मुद्दाम हांक मारली, तेव्हां नुसतं ' जरा घाईत आहे आतां ' असं म्हणून निघून गेली !

**पांडू**ः—तिनं वचन दिलं आहे मला !

**दत्ता**ः—माझ्या ध्यानांत आहे तें ! म्हणूनच आज तिला मी गांठणार आहें ! चल तारा !

[ तीं दोघें निघून जातात. पांडू खिडकींत जाऊन पाहूं लागतो. एकदम दचकून बाहेर जातो. एका क्षणानें दुसऱ्या अंकाच्या आरंभीं आलेल्या त्या माणसाबरोबर आंत येतो. आंत येतांच कागदांची देवघेव होते ]

**पांडू**ः—असं असेल तर एकदम तें सारं हालवा तिथून ! दुसरी जागा पहा कुणीकडे तरी. मला त्या हेमूचा संशय येऊं लागलाय ! मला वाटतं त्यानं मला ओळखलंय. आज उद्यां आलंच मला बोलावणं, तर काम बंद पडूं देऊं

नका. सुळावरची पोळी आहे ही. केव्हां माहेरीं जावं लागेल तें कांहीं सांगतां यायचं नाहीं. जा आतां! ( असें म्हणून त्याला लोटून बाहेर घालवतो, तोंच हेमंत आंत येतो. )

**पांडू:**—( हेमंतला ) घंटा वाजवली नाहींत आज!

**हेमंत,**—कशाला? तुला सावध करायला?

**पांडू:**—मी कधीं असतों बेसावध?

**हेमंत:**—आजचीं वर्तमानपत्रं पाह्यलींस?

**पांडू:**—( मोठमोठ्यानें हंसत ) आतां काय म्हणावं तुम्हांला? वर्तमानपत्र पाहून मला काय कळणार त्यांत?

**हेमू:**—रमू कुठं आहे?

**पांडू:**—कुठं बाहेर गेल्यायत्—एकट्याच! दादासाहेब पण बाहेर गेलेयत —ते मात्र एकटे नव्हे! मालक तेवढे आंत आहेत!

**हेमंत**—( खुर्चीवर बसत ) कुठं होतास तूं यापूर्वी?

**पांडू:**—यापूर्वी म्हणजे केव्हां?

**हेमंत:**—इथं नोकरीला राह्यच्यापूर्वी?

**पांडू:**—तुरुंगांत!

**हेमंत:**—तें मला माहीत आहे—पण त्यापूर्वी?

**पांडू:**—त्यापूर्वी होय! अशाच एका साहेबांकडे होतों. ते गेले आतां पेन्शन घेऊन कोंकणांत. कां?

**हेमंत:**—खोटं सांगतोयस—सेक्रेटरीएटमधें होतास केव्हां?

**पांडू:**—कशाला? झाडू मारायला? आतां काय म्हणावं तुम्हांला—( मोठमोठ्यानें हंसतो )

**हेमंत:**—हंसू नकोस! सारखी आठवण करतोंय मी, मी तुला पाहिलं आहे यांत शंकाच नाहीं. आमच्याच ऑफिसांत कुठंतरी! सारखं डोकं खाजवतोंय पण आठवत नाहीं! पट्टेवाला होतास कुठं?

**पांडू:**—( पुन्हां हंसत ) असं होय? त्या काळ्या घोड्याजवळच्या मोठ्या इफीसांत होय? माझा थोरला भाऊ होता तो. पटेवाला होता लठ्ठेसाहेबांकडे. माझ्याच सारखा दिसतो तो. पण चांगला चार बोटं उंच आहे माझ्यापेक्षां. आतां नाहीं तो तिथं! ते सगळे कॉंग्रेसवाले बाहेर पडले तेव्हां तोही गेला नोकरी सोडून! आतां लढाईवर गेलाय तो!

हेमंतः—असं का ? कुणाला सांगतोस हें ? आजचीं वर्तमानपत्रं पाहिलीं नाहींत म्हणतोस ?—अन् हा क्रॉनिकल कुणी उघडून ठेवलाय इथं ? बॅरिस्टर पंढरीनाथला पकडून देणाराला एक हजाराचं बक्षिस लावलंय अशी बातमी आली आहे, तिथंच कां दुमडून ठेवलाय हा क्रॉनिकल ?

पांडूः—मला काय माहीत ? दादासाहेब वाचीत होते तो !

हेमंतः—त्यांचा दोस्त आहे वाटतं हा बॅरिस्टर पंढरीनाथ ?

पांडूः—कुठला बालिस्टर ?

हेमंतः—कधीं लपून छपून दत्ताला भेटायला येतो का कोण असा ?

पांडूः—नाहीं बा ! दिसायला कसा आहे तो ?

हेमंतः—( एकदम ) असा तुझ्यासारखाच !

पांडूः—( हंसण्याच्या उकळ्यावर उकळ्या येत ) माझ्यासारखा ?—माझ्यासारखा !—आतां ऐका—( घाईघाईनें सीता आंत येते तिला उद्देशून ) ऐकलंस सीताताई, हे काय म्हणतात तें ऐक. म्हणे एक कुणी बालिस्टर आहे, तो फरारी झालाय,—अन् तो म्हणे लपून छपून दादासाहेबांना भेटायला येतो इथं—( हंसण्याच्या उकळ्या देत ) अन् तो म्हणे माझ्यासारखा दिसतो.

सीताः—( गंभीरपणें ) तूं जा पाहूं आतां आंत. रमूताई कुठंय् ?

पांडूः—बाहेर गेल्यायत. दोन घंटे झाले बाहेर जाऊन !

सीताः—बरं बरं—तूं जा आतां आंत अन् अण्णासाहेब इथं येऊं लागले तर मला येऊन सांग.

[ क्षणभर स्तब्धता ]

सीताः—किती वेळ बसणार आहांत इथं ?

हेमंतः—त्याच्याशीं तुला काय करायचंय ?

सीताः—मला बोलायचं तुमच्याबरोबर—बरंच बोलायचंय !

हेमंतः—नायकिणीच्या पोरीबरोबर मी बोलत नसतों !

सीताः—अन् तुमचे वडील ?

हेमंतः—ते सुद्धां. फार सभ्य माणूस आहेत ते.

सीताः—असं कां ? एकदा विचारा त्यांना.

हेमंतः—काय विचारूं ?

**सीताः**—मी त्यांची कोण म्हणून विचारा.

**हेमंतः**—तूं !

**सीताः**—हो, हो, मी ! मी बहीण आहे तुमची—सावत्र बहीण—तुमच्या बापाच्या रखेलीची मुलगी.

**हेमंतः**—गप्प बैस हलकट पोरी !

**सीताः**—एकाच घरच्या अवलादी आहोंत आपण.

**हेमंतः**—अशी नातीं जोडूं लागलीस भलतींच म्हणजे मी थंड पडेन असं तुला वाटतं होय ?

**सीताः**—बापाला विचारा आपल्या—आईला विचारा—तुमची आई ओळखते मला—तिनंच माझं नांव ठेवलं 'सीता' !

**हेमंतः**—छान ! नायकिणीची मुलगी म्हणे सीता ! काय नांव ठेवणाराचा गाढवपणा हा !

**सीताः**—तुमच्या आईनंच नांव ठेवलं हें माझं. ऐकलंत ? तुमच्या आईनं !

**हेमंतः**—( चिडून ) आतां पुरे झाला हा पाचकळपणा ! आतां जा पाहूं इथून मुकाट्यानं.

**सीताः**—नाहीं. अजून पुष्कळ बोलायचंय मला. सभ्य माणूस म्हणे ! सभ्य माणसं अशीं केसानं गळा कापीत नसतात. चोरटा संबंध ठेवला पण उघडकीस येऊं लागलं म्हणून तुझ्या बापानं नांव टाकलं माझ्या आईचं. लग्न झालं नव्हतं तरी ती मोठी पतिव्रता होती. हाय घेतली तिनं तेव्हांपासून —क्षय लागला न् त्यांतच मेली !—( एक क्षणभर थांबून ) तेव्हां मी सारी दोन वर्षांची होतें. आईनं मला आपल्या बहिणीच्या ओटींत घातली.— तिचीही मुलगी दोनच वर्षांची होती—ऐकलंस ?—ऐकलंस दादा ?—

**हेमंतः**—गप्प बैस—कुणाला दादा म्हणतेस ?

**सीताः**—माझ्या मोठ्या भावाला !—दोघीही दोनच वर्षांच्या होतों. दोघींनाही तिनंच वाढवलं. तीही माझ्या आईच्या पाठोपाठ मरून गेली. क्षयानं झुरून नव्हे—टायफॉईडनं मेली. तिचा शेट मोठा सज्जन माणूस होता. त्यानंच माझ्या आईला मरतांना वचन दिलं होतं अन् तें अजूनपर्यंत पाळतोय तो सज्जन माणूस.

**हेमंतः**—कोण तो ?

**सीताः**—अण्णासाहेब.

**हेमंतः**—( दचकून ) अण्णासाहेब !

**सीताः**—हो हो ! अण्णासाहेब. म्हणूनच येतें मी इथं. ( क्षणभर थांबून ) आम्हीं दोघीही दुसऱ्याच वर्षी पोरक्या झालों ! ( पुनः क्षणभर स्तब्धता )

**सीताः**—विचार ना आतां काय विचारायचं तें ! पारखीं झालेलीं असलों तरी आपण भावंडं आहोंत.—पारखीं झालों याला कारण तुझा बाप—( दांत ओठ खाऊन ) माझा बाप ! तेव्हां पासूनच ते न् अण्णासाहेब दूर झाले एकमेकांपासून. तो तुझ्यामाझ्या बापाचा निर्दयपणा पाहून अण्णासाहेबांना शिसारी आली तुझ्या बापाची—( एक सुस्कारा सोडून ) कांहीं दिवस आम्हां दोघींनाही माझ्या मावशीनं वाढवलं पण पुन्हां आम्हीं दोघं दोहींकडे झालों—( त्याच्याकडे रोंखून पाहून ) विचार ना पुढं.

**हेमंतः**—तुझ्या एकासुद्धां शब्दावर माझा विश्वास नाहीं. कोणत्या उद्देशानं हा बनाव बनावतेयस ?

**सीता**—( न ऐकलेंसें करून )—त्या दुसरीला दत्ताच्या आईनं आपल्या ओटींत घेतली. आपल्या नवऱ्याची मुलगी ती आपलीच मुलगी म्हणून लहानाची मोठी केली. ( एक मोठा सुस्कारा सोडून ) तीही बिचारी मरून गेली.

**हेमंतः**—कोण ? ती मुलगी ?

**सीताः**—नाहीं. दत्ताची आई. ती मुलगी बिचारी खुशाल आहे !

**हेमंतः**—कुठं आहे ती ?

**सीताः**—सणंग खरेदी करायला गेलीय आपल्या लग्नासाठीं !

**हेमंतः**—हलकट पोरी—

**सीताः**—गप्प बैस हलकट माणसाच्या पोरा !

**हेमंतः**—ती रमू ?

**सीताः**—होय—ती रमूच ! माझी मावस बहीण, दत्ताची सावत्र बहीण—सख्खी नव्हे, औरस नव्हे, रमू सुद्धां नायकीणीचीच मुलगी आहे एक ! जा जाऊन सांग आपल्या बापाला, कीं तुझ्या रेखेलीच्या बहिणीची मुलगी तीच ही रमू ! अण्णासाहेबांच्या अर्ध्या इस्टेटीवर नजर ठेवून जिला आशीर्वाद दिला ती ही रमू सुद्धां एक कलावंतिणीचीच मुलगी !—बोल, आतां करणार

आहेस तिच्याशीं लग्न ? तुझी बहीण म्हणून विचारतेंय—तुझ्या बापाची मुलगी म्हणून विचारतेंय—पाळणार आहेस आपलं दिलेलं वचन ?

[ दत्ता आणि तारा प्रवेश करतात. हेमंत सुन्न होऊन बसला आहे. दत्ताची नजर पहिल्यानें सीतेकडे जाते. ]

**दत्ताः**—इथं आलीस होय तूं ? मी गेलों तुला शोधायला तुझ्या घरीं ! ( हेमंताला पाहून दचकून ) हेमू !

[ हेमू निर्विकार बसला आहे. सीता ज्वालामुखीसारखी धुमसत उभी आहे. दोघेंही उत्तर देत नाहींत. सारा जीव डोळ्यांत आणून दत्ता सीतेकडे कांहीं वेळ टक लावून पहातो ]

**दत्ताः**—सीता, तूं सांगितलंस याला !

**सीताः**—( गंभीरपणें ) हो !

**ताराः**—( अस्वस्थपणें ) याला सांगितलंस शेवटीं !

**सीताः**—हो !

[ क्षणभर स्तब्धता ]

**दत्ताः**—केवढा घात केलास !

**सीताः**—नाहीं—घात होणार होता—बहीणीच्या जिव्हाळ्यानं मी माझ्या बहिणीला वाचवलं !

**दत्ताः**—( हेमंताला ) कळलं ना तुला सारं ? आतां काय म्हणणं आहे तुझं ?

**हेमंतः**—कळलं—कांहीं म्हणायचं नाहीं मला. माझा मी मुखत्यार नाहीं. माझ्या वडिलांना आतां विचारलं पाहिजे मला.—( एकदम उठून सीतेला ) तुझा डाव मला कळला. त्या पळपुट्याच्या गळ्यांत बांध तिला खुशाल ! ( उठून तिच्या आंगावर जाऊन ) मी तुला सांगून ठेवतों, तुझा डाव सिद्धीला जायचा नाहीं.

**सीताः**—तें मला माहीत आहे. एकाला खर्ची घातल्याशिवाय एकाचं कल्याण व्हायचं नाहीं !

**हेमंतः**—आतां पहाच तर गंमत. ( एकदम निघून जातो )

**दत्ताः**—( सीतेला ) ही काय आहे आणखी भानगड ?

**सीताः**—( आंतील दाराकडे जाऊन ) पांडू—( पांडू येतो ) ऐकलं ?

**पांडूः**—हो ऐकलं—सारं कांहीं ऐकलं !

**सीताः**—मग जा पाहूं इथून आतां !

**पांडूः**—नाहीं—

**सीताः**—मी पाया पडतें, इथून जा !

**दत्ताः**—( पुढें येऊन ) पण कां ?

**सीताः**—तूं उगी रहा दादा—( पांडूला ) कृपा करून जा म्हणतें ना !

**पांडूः**—या प्रकरणाचा शेवटचा निकाल झाल्याशिवाय मी इथून जाणार नाहीं.

**सीताः**—त्यानं ताडलं आहे !—तो गळा कापील !—

**पांडूः**—एकाच्या कल्याणासाठीं एक खर्ची पडलाच पाहिजे ! खरं बोललीस तें !

**दत्ताः**—( पांडूला ) कोण आहेस तूं ?

**पांडूः**—( हंसून ) बसा जा तिथं—वहाणा आणून देऊं ?

**ताराः**—( दत्ताला ) काय चाललंय हें ? एकावर एक कसले हे विळखे पडताहेत ? कोण आहे हा प्राणी ? कसलं संकट येणार आहे याच्यावर ?

**पांडूः**—काय आणूं ? सोडा, लेमन, ऑरेंजज्यूस कीं चहा ?

**दत्ताः**—कांहीं आणू नकोस ! तूं कोण आहेस तें आधीं सांग मला—कसला धोका आहे तुला ? आमच्यासाठीं कां असा आपला जीव धोक्यांत घालतोयस ?

**पांडूः**—तुमच्यासाठीं नव्हे—पांढरपेशांसाठीं नव्हे—सभ्य, घरंदाज, सोज्वळ माणसांसाठीं नव्हे—एका कलावंतिणीच्या मुलीसाठीं—एक खुळया भोळया, विश्वासू, स्वप्नाळू जीवासाठीं !

**दत्ताः**—कोण आहेस तूं ?

**पांडूः**—( हंसत ) बसा ना. ( खालीं दत्ताच्या पायापाशीं बसून ) बूट काढूं का पायांतले ?

**सीताः**—( गच्चीवरून ) आतां किती वेळ हें असं सोंग करीत रहाणार ? तुमच्या पायांचं तीर्थ घ्यायचं आम्हीं, ते तुम्हीं बूट काढणार आमचे ?

**दत्ताः**—सीता, सीता—आतां किती अंत पहाशील ? कोण आहेत हे !—सांग ना, हे कोण आहेत ?

**सीता;**—( पांडूला ) सांगूं ?

**पांडूः**—थोडा अवधि आहे अजून. जरा धीर धर. माझ्यासाठीं तोंड बंद

ठेव !—माझ्यासाठीं नव्हे—रमेसाठीं—अण्णासाहेबांसाठीं—( झट्कन् निघून जातो )

**ताराः**—( सीतेला कवटाळून ) सीता, सांग—काय आहे हें ? कोण आहेत हे ? ( सीता स्तब्ध रहाते ) कां आमच्यासाठीं आपला जीव एवढा धोक्यांत घालतो आहे ?—( दत्ताला ) कांहींच का माहीत नाहीं तुम्हांला ? ( तो नकारार्थी मान हालवतो ) काय होणार आहे आतां ? कुणी तरी सांगा मला, आतां काय होणार आहे ?

[ बाहेरून रमा 'प्रेमभरें रंगलें' या पदाचा पहिला चरण गात गात येत असल्याचा आवाज ऐकूं येतो. तिघेंही अस्वस्थ होतात. ]

**सीताः**—( खालच्या आवाजांत किंचाळून ) नाहीं—नाहीं—यावेळीं तिला भेटणार नाहीं मी—( एकदम आंत जाते ).

[ दत्ता आणि तारा जाऊन एका कोचावर स्वस्थ बसतात. रमा मोठ्या आनंदानें गात गात आंत येते. तिच्या हातांत कार्डबोर्डच्या दोन मोठ्या पेट्या आहेत. तिच्या मागोमाग कपड्याचा बोजा डोक्यावर घेऊन एक हमाल येतो. तो बोजा तिथेंच ठेवतो. रमा त्याला पैसे देते. तो निघून जातो. ती खालील पद गात असतेः—

**प्रेम भरें रंगलें । सकल पाश भंगले । तुझ्याविणें कुणा न हें ठावें ॥ प्राशुनियां वचन सुधा फुलत हसावें । डुलत रुसावें । असत नसावें । मी प्रेमगुणें जीव दिला बांधुनिया अंतरिंचें गूढ कसें कोठें लपावें । वैराण जनीं । हैराण मनीं । या अल्प सुखें काय मी मरावें ॥**

[ हा सारा प्रकार गात गात चाललेला असतो. गात गात ती दत्ताजवळ येते आणि कार्डबोर्डच्या पेट्या उघडून त्यांतील साड्या त्याच्या आणि ताराच्या अंगावर फेकते ]

**रमाः**—पाहिलंस तारा, ह्या साड्या पाहिल्यास ? हीं ब्लाऊझेस् पाह्यलीस ? आणखी देखील घेतलींयत कितीतरी. दाखवतें हं.—थांब—

**दत्ताः**—थांब—एव्हां राहूं देत त्या साड्या.

**रमाः**—( साड्या हाताळीत ) हेमू म्हणाला, तुला आवडतील तसल्या साड्या घे. ब्लँक चेक देत होता मला—पण मी म्हटलं, माझ्या साड्या मी घेणार, अगदीं खूप खूप घेणार, माझ्या पैशांनीं घेणार. मला काय भीक लागलीय म्हणून मी हेमूच्या पैशानं साडी घेऊं? यावेळीं तरी नको मला त्याच्या घरची साडी !—

**दत्ताः**—( सुन्नपणें ) यावेळीं कां? केव्हांच !

**रमाः**—म्हणजे? असा काय चमत्कारिक पहातोयस दादा? ( दत्ताच्या अगदीं जवळ जाऊन ) काय झालंय?

**दत्ताः**—संपलं—रमू, बाळ, सारं संपलं !—तेवढंच नाटक होतं तें—भलत्याच जागीं संपलं तें नाटक. शेवट व्हायचा नव्हता त्या नाटकाचा.

**रमाः**—( घाबरून ) कसलं नाटक?

**दत्ताः**—तुझ्या जन्माचं नाटक—जन्माचं नव्हे, तुझ्या जिण्याचं !

**रमाः**—( तारेला ) काय बोलतोय हा असं?

**ताराः**—खरंय तें.

**रमाः**—म्हणजे?

**दत्ताः**—रमू—आतां यापुढं हेमू इथं यायचा नाहीं.

**रमाः**—कां?

**दत्ताः**—तें मला विचारूं नकोस. विसरून जा त्याला. हेमू नांवाची कुणी व्यक्ति तुला केव्हां भेटली होती हें आतां मनांत सुद्धां आणूं नकोस.

**रमाः**—काय केलं त्यानं?

**दत्ताः**—त्यानं कांहींच केलं नाहीं.

**रमाः**—तर मग कुणी?

**दत्ताः**—तें मला विचारूं नकोस.

**रमाः**—( हंसून ) वेडा आहेस तूं दादा, भलतंच कांहीं तरी वेड घेतलंयस डोक्यांत ! काय सांगितलं कुणी तुला?—कुणी हें विष ओतलं तुझ्या कानांत?—कसलं आहे हें विष?

**दत्ताः**—कृपा करून मला कांहीं विचारूं नकोस रमू.

**रमाः**—मी हेमूलाच विचारतें—आत्तांच फोन करून बोलावतें त्याला. ( धांवत आंत जाते )

**तारा**ः—तो येईल ?

**दत्ता**ः—मला नाहीं वाटत तो येईल म्हणून—( थांबून ) कुणी सांगावं कदाचित येईल दिखील. मोठीं बेरड असतात हीं असलीं माणसं !

**तारा**ः—बायकांच्या जातीचं जिणं मोठं वाईट !—त्यांतून ही अशी ही ! काय आहे हिचा दोष ? वायकिणीची मुलगी म्हणून हेमू सीतेला हिणवीत होता. आतां काय करील तो ?—कीं पैशाच्या लोभाला बळी पडेल नि होय म्हणेल ?

**दत्ता**ः—हें इंग्रजी अर्थशास्त्र चालत नाहीं या भारतवर्षांत ! पैशाच्या लोभापेक्षां जातीचा अभिमान मोठा दुर्धर असतो. त्या जातीच्या अभिमानाच्या मुळाशीं रक्तारक्तांतून भिनलेली जी एक भावना असते, त्या भावनेचा अंदाज करतां यायचा नाहीं कुणाला. त्या जातीच्या अभिमानापायीं वाटेल तें खर्चीं घालायची तयारी असते माणसाची. जिव्हाळ्याच्या माणसाचा देखील गळा कापील कुणी या जातीच्या अभिमानापायीं. मोठमोठे सुधारक म्हणवणारे सुद्धां पांगळे पडलेयत या जातीच्या अभिमानापुढं—

**रमा**ः—( आंत येत येत ) चांगलं रोजच्या सारखा बोलला तो फोनवर ! उगीच मला घाबरवून सोडलं तुम्हीं दोघांनीं. आत्तां येतोय तो मोटारींतून. आतां चांगलं नाक ठेंचील तुम्हां लोकांचं.

**दत्ता**ः—देव करो आणि तसंच होओ ! ( मान हालवीत )—पण तसं व्हायचं नाहीं. तुला झुलवतोय तो !—फसवतोय !—पूर्वीपासूनच मला शंका होती—पूर्वीपासूनच मी घाबरत होतों या कर्माला—पण रमू, तसं होणं मोठं कठीण आहे. आतां दिसेलच तुला. ( एकदम विचार करून ) चल तारा, आपण आंत जाऊं—या दोघांना बोलूं दे अगदीं मोकळेपणानं—( तारेला घेऊन आंत जातो )

**रमा**ः—वेडा बिचारा दादा !—( तें पूर्वींचेंच पद ती गाऊं लागते. गातां गातां मोठ्या आनंदानें बागडत असते, इतक्यांत हेमंत येतो. ती धांवत त्याच्याकडे जाते आणि त्याचे हात धरते. )

**रमा**ः—आलास ? किती घाबरवलं मला या लोकांनीं—

**हेमंत**ः—( रुक्षपणें ) कां बोलावलंस मला ?

**रमाः**—हें काय विचारणं झालं ? या साडया पाहिल्यास ? किती दिवस हेरून ठेवल्या होत्या या मी ! घेईन तर या वेळींच घेईन असं ठरवलं होतं. पाहिल्यास ? ( साडया उघडून दाखवीत )—-या पहा—

**हेमंतः**—आतां तूंच पहा त्या.

**रमाः**—म्हणजे ? तुला नाहींत या पसंत ?

**हेमंतः**—माझ्या पसंतीचा प्रश्नच मिटला आतां.

**रमाः**—म्हणजे ?

**हेमंतः**—आपल्या लग्नाला बाबांची संमति नाहीं—

**रमाः**—काय म्हटलंस ? ( तो होकारार्थी मान हालवतो ) काय बोलतोस हें ? कालपर्यंत ते मला सूनबाई म्हणत होते—त्या दिवसापासून मी रोज घरीं येतें तुझ्या. रोज तुझी आई सुद्धां माझं कौतुक करीत होती नि आजच काय झालं ?

**हेमंतः**—,आजच काय झालं !—तिनं सांगितलं तेव्हां मला तितकंसं खरं वाटलं नव्हतं—

**रमाः**—तिनं ? कुणीं ?

**हेमंतः**—तुझ्या बहिणीनं !—सीतेनं—

**रमाः**—( दचकून ) सीता . माझी बहीण ? काय वेड्यासारखं बोलतोयस ! ती कोण, मी कोण,—ती नायकिणीची मुलगी आणि मी—

**हेमंतः**—तूं सुद्धां.

**रमाः**—मी ? मी नायकिणीची मुलगी ? ( मोठ्यानें ओरडून ) अण्णा, आधीं इकडे यां अण्णा—हा हेमू काय म्हणतोय पहा—( किंचाळून ) अण्णा ! !

[ अण्णासाहेब घाबऱ्या घाबऱ्या येतात. ]

**रमाः**—हा हेमू काय म्हणतोय पहा अण्णा.

**अण्णाः०**—काय म्हणतो ?

**रमाः**—( रडकुंडींला येऊन ) मला नायकिणीची मुलगी म्हणतो. हा हेमू म्हणतो मला नायकिणीची मुलगी.

**अण्णाः०**—( दचकून हेमंतला ) होय ? ( हेमू होकारार्थी मान हालवतो ) कोण म्हणतो असं ?

**हेमंतः**—खोटं आहे तें ?

**अण्णा०:**—पण कोण म्हणतो असं ? कुणी सांगितलं हें भलतंच कांहीं तुला ?

**हेमंत:**—कुणी का असेना—पण स्पष्ट सांगा, ईश्वराला स्मरून सांगा, हें खोटं आहे ?

[ अण्णासाहेब एकदम मट्कन खालीं बसतो आणि डोकें धरून स्वस्थ रहातो. क्षणभर सर्वच स्तब्ध ]

**हेमंत:**—आतां कां स्तब्ध बसलां आहां ? बोला ना, ही तुमच्या लग्नाच्या बायकोची मुलगी आहे ?

**अण्णा०:**—( खचून ) तिच्याच अंगावर वाढलीय ही !

**हेमंत:**—पण हिला जन्म कुणी दिला ?

**अण्णा०:**—( खोल आवाजानें ) तिनं नव्हे खरा—

**हेमंत:**—( रमेला ) ऐक आतां !

**रमा:**—( अण्णासाहेबांना )—होय अण्णा ?—( अण्णासाहेब स्तब्ध राहतो ) कां माझी फसवणूक केलीत ही ?

**अण्णा०:**—फसवणूक कसली पोरी ?—तूं माझी मुलगी आहेस.

**रमा:**—पण तुमच्या पत्नीची नव्हे—होय ना ?

**अण्णा०:**—तीही पत्नीच होती माझी !

**हेमंत:**—पण विधियुक्त लग्नाची पत्नी होती का ती ?

**अण्णा०:**—कसले घेऊन बसला आहांत विधी ? काय जास्त होतं होमानं नि हवनानं ? कुठल्या तरी घाणेरड्या भटानं उच्चारलेल्या चार वेड्या वांकड्या शब्दांतच का सारं पावित्र्य सांठवलेलं असतं ?

**हेमंत**—नसेल—पण शास्त्र काय म्हणतं ?—कायदा काय म्हणतो ?

**अण्णा०:**—आग लावा त्या शास्त्रांना आणि कायद्यांना !

**हेमंत:**—हें व्यवहारी जग आहे अण्णासाहेब. इथं कदाचित् शास्त्रांना आग लावतां येईल पण कायद्यांना आग लावतां येत नाहीं. या मुलीला तुमचा कायदा औरस मुलगी म्हणेल का ?

**अण्णा०:**—न कां म्हणेना. मला त्याची पर्वा नाहीं.

**हेमंत:**—पण आम्हांला त्याची पर्वा आहे. आम्हीं कुलीन माणसं आहोंत.

[ सीता एकदम बाहेर येते. पांडू येऊन दाराशीं उभा रहातो. ]

**सीता**:—( हेमंतला ) असं का ? नि हे नाहींत वाटतं कुलीन ? अण्णासाहेब, मी कोण आहें ?—( अण्णासाहेब स्तब्ध रहातो ) कोण आहें मी ?

**अण्णा०**:—जाऊं दे सीता, त्यां गोष्टी नकोत आतां.

**रमा**:—कोण आहेस तूं ?

**सीता**:—विचार या हेम्याला—विचार या हेम्याच्या बापाला.

**हेमंत**:—गप्प बैस अवदसे !

**सीता**:—मी अवदसा, तर तूं कोण दादा ? झोटिंग ?

**रमा**:—( आश्चर्यानें ) दादा ?

**सीता**:—हो. याच्या बापाची मुलगी आहें मी. तूं जशी दत्ताची बहीण तशीच मी याची बहीण ! आणि कुलीनपणाचा दिमाख मिरवतोय हा आमच्यासमोर.

**हेमंत**:—पण मी कुलीन आहें.

**रमा**:—असं का ? कसा झालास तूं कुलीन ? ( सीतेकडे बोट दाखवून ) हीं असलीं मुलं निर्माण होऊं देणाऱ्या माणसाचा मुलगा कुलीन होय ? नायकिणीची मुलगी म्हणून हिला हिणवीत होतास, पण नायकिणीची असली तरी ती तुझ्या बापाची मुलगी होती. तूं कुलीनपणाचा दिमाख मिरवतोस ? बोल आतां, काय करणार आहेस ?

**हेमंत**:—या तुमच्या गोतावळयाला शेवटचा रामराम ठोकून आतां घरीं जाणार आहें.

**अण्णा०**:—जा तर मग. काळं कर इथून.

**रमा**:—अण्णा !

**अण्णा०**:—असल्या माणसाशीं लग्न करणार आहेस ?

**रमा**:—अण्णा, 'हा तुझा नवरा, हा तुझा नवरा,' असं इतकीं वर्षं माझ्या कानीं कपाळीं ओरडत आलां. गेलीं तीन वर्षं आम्हीं हातांत हात घालून हिंडलों फिरलों, तेव्हां नव्हतं का कळलं तुम्हांला ?

**अण्णा०**:—नव्हतं पोरी, नव्हतं ! ती चूक झाली माझी. गाढवपणा झाला माझा. मी तुला फसवलं—नाहीं—मी मलाच फसवून घेत होतों. आज या क्षणाला माझे डोळे उघडले. मला क्षमा कर पोरी, मला क्षमा कर !

**सीता**:—( हेमंतला ) नीघ इथून हलकटा !

हेमंतः—हलकट तूं !—

सीताः—नाहीं—मी माझ्या बापाची मुलगी आहें. माझ्याकडे पहा—आणि स्वतः आपल्याकडे पहा नि मग सांग कोण हलकट आहे तें !

रमाः—जाऊं दे त्याला सीता. मोलाचा शब्द कशाला खर्ची घालतेस ? जा बरं हेमू, सुखानं जा. कुणातरी कुलीन श्रीमंताच्या पोरीचा गळा काप जा. पुन्हां तोंड सुद्धां दाखवूं नकोस आम्हांला.

हेमंतः—कां बरं ? आतां सर्वांनाच हें कळून चुकेल, डांगोरा पिटला जाईल साऱ्या मुंबईभर, अन् मग तुला देखील तुझ्या आईसारखंच दुकान उघडावं लागेल—( रमेच्या जवळ जाऊन ) त्यावेळीं तुझं पहिलं गिऱ्हाईक मी होईन.—तसा कुळाचार विसरणार नाहीं मी.

[ पांडू एकदम जाऊन काडकन् त्याच्या थोबाडींत देतो ]

पांडूः—नीच इथून पाजी माणसा.

हेमंतः—तुझी देखील निघायची वेळ आलीय जवळ. ( मोठमोठ्यानें हंसतो —पांडू त्याला धक्की मारून बाहेर घालवतो )

रमाः—( एकदम भडभडून येऊन ) अण्णा ! काय केलंत हें ? कां माझी अशी फसवणूक केलीत ? कां असा हा पडदा माझ्या डोळयावर बांधलात ? मायेच्या सुरीनं कां माझा असा हा गळा कापलात ?—

अण्णा०:—हो—खरं आहे. मायेच्या सुरीनं मी तुझा गळा कापला. क्षणाच्या मोहाला बळी पडलों. मला वाटलं, जगाला फसवीन. माझी बायको मोठी साध्वी होती. तिनं तुला आपल्या कुशीला घेतलं—कुसव्याची मुलगी म्हणून वाढवलं—दत्ताला तें माहीत होतं—कुठं गेला दत्ता ?—

सीताः—( दाराशीं जाऊन ) दादा, इकडे ये. तुला अण्णा बोलावताहेत !

अण्णा०:—नको नको ! कसं हें तोंड दाखवूं त्याला. मी फसवणूक करीत होतों म्हणूनच माझ्याशीं भांडून तो निघून गेला. ( दत्ता आणि तारा येतात ) होय ना दत्ता ? मी ही फसवणूक करीत होतों म्हणूनच ना माझ्याशीं भांडून गेलास ? सांग मला, तुझ्या सारखंच आहे ना हिचं रक्त ? एकाच बीजाचे ना हे दोन अंकूर ?—मग तूं कुलीन कां नि ही अकुलीन कां ?—असंच ना मी विचारलं होतं तुला त्यावेळीं ? तूं बच्चा होतास तेव्हां असं मला

वाटत होतं. पण तूं शहाणा होतास!—एवढे पावसाळे घालवून मी मात्र मूर्खपणा केला. या पोरीचा असा गळा कापला.

दत्ताः—नाहीं अण्णा, माझी बहीण आहे ती. या माझ्या तारेची मैत्रीण आहे ती—या सीतेची बहीण आहे—मावस बहीण—

रमाः—( दचकून सीतेला ) होय ?

सीताः—( तिला कवटाळून ) होय रमूताई—खरोखरच तूं ताई आहेस माझी. मी आक्का आहें तुझी !

दत्ताः—सारीं राहूं आपण इथं आनंदानं ! अनाथाश्रम होऊन राहील हा. दोन विधवा बहिणी आहेत घरीं असं समजून राहूं आम्हीं !

रमाः—( साड्यांच्या राशीकडे बोट करून ) या जाळून टाका आतां कुणी तरी ! चार दिवसांनीं माझं लग्न होणार म्हणून मी हुरळलें होतें. साड्या दागिने गोळा करीत होतें. सासरीं जायच्या गोष्टी बोलत होतें—( सुस्कारा सोडून ) तो बाजार आतां आटोपला. ती डोळ्यावरची धुंदी उतरली. पतिव्रतेचीं पोरं असलों तरी नायकिणीच्या मुली आहोंत आम्हीं. कुलीनांच्या लागीं नाहीं आमचं जिणं—

पांडूः—असं कां म्हणतां ? ( अण्णाला ) मालकसाहेब, एकच शब्द विचारायचा आहे मला—परवानगी आहे आपली ?

अण्णा०ः—खुशाल विचार ! कुणी कांहींही म्हटलं तरी मला आतां त्याची पर्वा नाहीं !

पांडूः—कुलीनाशीं हिचं लग्न व्हावं म्हणून ना तुम्ही ही फसवणूक केलीत ?

अण्णा०ः—असंच कांहींसं माझ्या मनांत होतं खरं !

पांडूः—कुणबी कुलीन असतो का ?

अणा०ः—( दचकून ) म्हणजे ?

पांडूः—हिला कुलीनपणा देण्यासाठीं मी हिच्याशीं लग्न करायला तयार आहें.

अण्णा०ः—कुणब्याशीं ?

पांडूः—हो ! कुलीन कुणब्याशीं ! ( रमेला ) आहे कबूल ?

सीताः—होय म्हण. रमे, होय म्हण ! भाग्य पाहिजे असलं स्थळ मिळायला तुला !

दत्ताः—खरोखरच तूं कुणबी आहेस ?

पांडूः—मी आहें हा असा आहें. मी जात मानीत नाहीं, मी धर्म मानीत नाहीं,—माणसाखेरीज मी दुसरा देव मानीत नाहीं—असा मी एक त्या देवाघरचा कुणबट आहें. घ्याल मला आपल्या कुटुंबांत ?

सीताः—( सर्वांकडे वळून ) होय म्हणा. होय म्हणा सारींजणं. अशी संधि यायची नाहीं पुन्हां.

अण्णा०ः—( आपल्याशींच ) कुणबी—कुलीन कुणबी—

दत्ताः—काय बिघडलं त्यांत ? पण जरा शिकलेला असता—

पांडूः—सुशिक्षित माणसाची अक्षरशत्रू बायको नसते का ? तसंच समजा ना हें. आजपर्यंत बायको नवऱ्याची सेवा करीत आली आहे—आतां बायकोची सेवा करणारा नवरा करूं या कीं आपण उत्पन्न ! नुसतं कुलीनाचं नांव द्यायंचं—एवढंच ना ?—मोठं घरंदाज आहे माझं घराणं—

रमाः—मग नको जाळूंस त्या साऱ्या दादा. नायकिणीची पोर म्हणून जगानं म्हणण्यापेक्षां कुणब्याची बायको म्हणून घेण्यांत मला हजारपट अभिमान वाटेल.

ताराः—प्रेमाशिवाय ?

रमाः—कसलं आलंय प्रेम तारा ? जन्मापासून नांवं टिचलीं, प्रेम प्रेम करीत गेलीं तीन वर्षं हिंडलो, केवढीं काव्यें केलीं, केवढीं गाणीं म्हटलीं, किती सुस्कार सोडले प्रेमाचं नांव घेऊन, किती मनोराज्यं बांधलीं प्रेमाच्या नांवानं —कुठं गेलीं आतां तीं ? आग लाव त्या प्रेमाला ! पांडू—

[ इन्स्पेक्टर आणि पोलीस पार्टी प्रवेश करतात ]

रमाः—( त्यांना न पहातां एकदम जाऊन पांडूचा हात धरून ) हाच वाङ्निश्चय पांडू.

इन्स्पे०—बॅरिस्टर पंढरीनाथ संझगिरी, Under the defence of India rules you are under arrest.

पांडूः—चला !

दत्ताः—म्हणजे ? तूं बॅरिस्टर पंढरीनाथ ? तुम्हीं माझे बूट झाडले ? ( एकदम जाऊन त्याचे पाय धरतो. )

पांडूः—( दत्ताला वर उचलून हृदयाशीं कवटाळून ) भारतमातेच्या प्रत्येक लेंकराचा दास आहे हा पंढरीनाथ. ( अण्णासाहेबांच्या पायावर मस्तक

ठेवून ) माहेरीं चाललोंय अण्णा, तिथून निरोप दिला आईनं कीं येईन पुन्हां सासरीं.

**अण्णा०ः**—चिरंजीव हो बाळ. सारं जग नांव घेतं आहे आज, तो पंढरीनाथ हा अं ? नामदेवाच्या घरीं—एकनाथाच्या घरीं तो पंढरीनाथ राबला होता—या पापी अण्णाच्या घरीं हा पांडू—

**पांडूः**—आतां जांवई झाला आहे ? रामा नव्हे—नोकर नव्हे—काय रमू ?

**रमाः**—मलाही न्या ना बरोबर इन्स्पेक्टर साहेब—एक दया करा. एक दिवसाचा अवधि द्या—तेवढ्यांत एकदां आम्हीं लग्नगांठ बांधून घेतों—

**इन्स्पेक्टरः**—मी हुकूमाचा ताबेदार आहें बाईसाहेब. चला बॅरीस्टर !

**पांडूः**—उगीच झडती घेऊन त्रास देऊं नका या गरीब बिचाऱ्यांना—इथं कांहीं सुद्धां मिळायचं नाहीं तुम्हांला.

**इन्स्पेक्टरः**—तें माहीत आहे मला—चला. ( ते जाऊं लागतात )

**सीताः**—इन्स्पेक्टरसाहेब, तेवढे हजार रुपये देणार आहांत ना हेमंत पंडीतला ?

**रमाः**—( तारेला कवटाळून ) आतां केव्हां येतील ग हे ?

**दत्ताः**—कुणी सांगावं केव्हां येतील ते !—तोंपर्यंत वाट पहा—मोठी भाग्यवान आहेस तूं रमा.

**अण्णा०ः**—मोठी भाग्यवान आहेस तूं रमा !

[ बाहेरून जमलेल्या लोकांचा जयघोष ऐकूं येतो. ]

**—वंदे मातरम्—**

# या ग्रंथकाराचीं पुस्तकें

**नाटकें**:—कुंजविहारी, संजीवनी, सरस्वती, वरवर्णिनी, हाच मुलाचा बाप, समर्थ भिकारी, लयाचा लय, संन्याशाचा संसार, सत्तेचे गुलाम, तुरुंगाच्या दारांत, नवा खेळ, करग्रहण, करीन ती पूर्व, सोन्याचा कळस, जागती ज्योत, स्वयंसेवक, समोरासमोर, कोरडी करामत, माझ्या कलेसाठीं, सारस्वत, त्याची घरवाली, भाग्याचा भगवंत, रंगभूमीच्या वाटेवर, सेनानी, चला लढाईवर, न मागतां, सिंगापुरांतून.

**लघुनाटकें**:—वज्रकुसुम, पापी पुण्य, संसार, नामानिराळा, सदा बंदिवान, श्रेय कुणाचं ?, आजचे संवाद, कडकलक्ष्मी.

**कादंबऱ्या**:—संसार कीं संन्यास ?, चिमणी, विधवाकुमारी, गोदू गोखले भाग १।२, धावता धोटा, परत भेट, कुलदैवत, उघडझांप, विकारी वात्सल्य, वेणू वेलणकर, उमलती कळी, न पुजलेली देवता, मलबार हिल, १९१४ नंतर, कुणाचा हा देश ?, भानगड गल्ली, पेटतें पाणी, सात लाखांतील एक, तरतें पोलाद, गीता, फाटकी वाकळ, मी—रामजोशी, शिपायाची बायको, द्राविडी प्राणायाम, तोंडमिळवणी.

**लघुकथासंग्रह**:—स्वैरसंचार, षोडशी, वैमानिक हल्ला व इतर गोष्टी, एकादशी.

**अनुवाद**:—श्रीकांत भाग १।२।३।४, गांवगंगा, भैरवी, विजया, विराज-वहिनी, विप्रदास, परिणीता, पंडित महाशय, शेष प्रश्न.

**इतर**:—आघात ( व्याख्यानें ), माझा नाटकी संसार ( आत्मचरित्रात्मक, श्रुतिका ( श्राव्य प्रकरणें ), पुनः आघात ( व्याख्यानें )

# आमचीं नवीन प्रकाशनें

**तोंड मिळवणी** कादंबरी ( ले. वरेरकर )
**चला लढाईवर** ( नाटक ) ले. वरेरकर
**न मागतां** [ नाटक ) ,,

## शरत्साहित्य

**परिणीता** कादंबरी अनुवादक—वरेरकर
**पंडितमहाशय**— ,, ,,
**विप्रदास**— ,, ,,

**पूर्णिमा**—कादंबरी ले० रत्नप्रभा रणदिवे
**ब्रँडीची बाटली**—( द्वितीयावृत्ती )
**झेंडूचीं फुलें**— ( ,, )
**लघुकथा संग्रह**—( समीक्षक मधील )
**उद्यांचा संसार**—( द्वितीयावृत्ती )
**कविता संग्रह**—ले० वा. रा. ढवळे

## बालवाङ्मय

**चन्द्रदूत** ले. श्री. बी. जी. जोशी
**चलाख परीट व चार चोर** ( सौ. जोशी )